# नवभारत

मार्च २०१३

* मर्ढेकरी कवितेचे रूपगोपन
* कोशवाङ्मय -- महाराष्ट्राचा बौद्धिक मानदंड
* गांधीवाद आणि मराठी कादंबरीची समीक्षा
* चोम्स्की : एक मोठे विचारवंत
* किरकोळ व्यापार क्षेत्रातील विदेशी थेट गुंतवणुकीचे राजगुह्य
* पुस्तक परीक्षण : टिकाऊ अर्थकारण

अनुक्रमणिका









द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई




नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

# आवाहन

'नवभारत' हे वैचारिक मासिक सुरू होऊन आता ६५ वर्षे झाली. साहजिकच मासिकाच्या मूळ कर्त्यांनी जे उद्देश डोळ्यांपुढे ठेवले होते, ते उद्देश स्वीकारून लिहिणारे लेखक व त्या उद्देशांविषयी आस्था बाळगणारे वाचक आता कमी होत चालले आहेत. तरीदेखील वैचारिक आदान-प्रदानाचे समर्थ व्यासपीठ म्हणूनच 'नवभारत' ने कार्य करीत राहावे असाच आमचा संकल्प आहे.

भारतीय परंपरेची ओळख व परिष्करण करून देणारे लेख येतच राहतील. परंतु, विज्ञान, अर्थकारण, तत्त्वज्ञानातील आधुनिक विचारप्रवाह, इतिहासलेखनाला आलेले नवे रूप इत्यादी विषयांची भाष्यरूपाने ओळख करून देणे, नवीन ग्रंथांची समीक्षा करणे, लोकसाहित्य, दलित-वाङ्मय यांना जी काळानुरूप वळणे मिळत आहेत त्यांचा मागोवा ठेवणे या विषयांवर भर देणे अगत्याचे झाले आहे. लघुकथा, ललित लेख व कविता या 'नवभारत' पूर्वीही कक्षेबाहेर ठेवल्या नव्हत्या व आताही त्या कक्षेबाहेर ठेवलेल्या नाहीत.

आज तालुक्याच्या ठिकाणी महाविद्यालये निघाली आहेत. येथील शिक्षण मराठी भाषेतून चालते व ते योग्यच आहे. तथापि, इंग्रजी वा अन्य भारतीय भाषांतील विचारप्रवाहांशी या शिक्षणाचा संबंध राहू नये, ही खेदाची गोष्ट आहे. या महाविद्यालयातील ग्रंथालयात अद्ययावत् पुस्तके येत नाहीत व आली तरी ती वाचून सकस चर्चा करतील असे अभ्यासूंचे गटही सहसा असत नाहीत. आमचे अनेक विद्यार्थी या महाविद्यालयातून प्राध्यापक व प्राचार्य आहेत. त्यांनी ही व्यथा आमच्यापाशी बोलून दाखविली व असेही सांगितले की, 'नवभारता'तील काही लेखांच्या छायांकित प्रती काढून त्यांनी विद्यार्थ्यांना आवर्जून वाटल्या.

आमची अशी खात्री आहे की, महाविद्यालये, तेथील प्राध्यापक व विद्यार्थी तसेच गावोगावी विखुरलेले अभ्यासू नागरिक यांना 'नवभारत' वाचण्याची व त्यातील लेखांवर चर्चा करण्याची सवय लागून जाईल. या सर्वांना आपले दर्जेदार लेख 'नवभारत' कडे अवश्य पाठवावेत.

यासाठी 'नवभारत'चा प्रसार झाला पाहिजे. आमची वाचकांना अशी विनंती आहे की, त्यांनी 'नवभारत'ला वर्गणीदार मिळवून देण्याची मोहीम चालवावी. जो वाचक पाच वर्गणीदार मिळवून देईल त्याने सहाव्या व्यक्तीचे नाव व पत्ता कळवावा. त्या सहाव्या व्यक्तीला 'नवभारता' चे अंक वर्षभर आमच्याकडून विनाशुल्क पाठवले जातील. वर्गणीदार कोणत्याही महिन्यापासून होता येते.

वर्षाची वर्गणी रू. ३००/- असून वर्गणी, चेक/डी.डी./मनिऑर्डर यांच्याद्वारे 'नवभारत'च्या पत्त्यावर पाठवावी. चेक/डी.डी. 'नवभारत' मासिक, या नावाने ३१५, गंगापुरी, वाई ४१२८०३ या पत्त्यावर पाठवावे.

**– संपादक मंडळ**

# लेखकांस आवाहन

*नवभारत मासिकामध्ये दर्जेदार वैचारिक लेखनाचे आम्ही नेहमीच स्वागत करतो. पण नवभारतकडे आपले लेखन पाठविण्यापूर्वी काही काळजी घ्यावी अशी विनंती आहे.*

*१. आपले लेखन सुवाच्य अक्षरात कागदाच्या एकाच बाजूस असावे.*

*२. आपण लेखनासाठी जे संदर्भ वापरले असतील ते लेखाच्या शेवटी काही टीपा असल्यास त्यासह द्यावेत.*

*३. महत्त्वाचे म्हणजे आपण आपला लेख यापूर्वी कुठल्याही नियतकालिकात प्रसिद्धीसाठी पाठविलेला नाही याची स्पष्ट कल्पना नवभारतच्या संपादकांना द्यावी.*

*४. नवभारतमध्ये लेख छापण्यापूर्वी तो संपादक मंडळाच्या योग्य त्या सदस्याकडे वाचनासाठी व अभिप्रायासाठी पाठविला जातो त्यामुळे तो लेख कुठल्या महिन्यात नवभारतमध्ये येईल किंवा येणार नाही हे यथावकाश कळविले जाईल याची लेखकांनी कृपया नोंद घ्यावी.*

*आपल्या सहकार्याबद्दल संपादक मंडळ आपले आभारी आहे.*

**- संपादक मंडळ**

वर्ष ६६ । अंक ६ । मार्च २०१३
माघ/फाल्गुन शके १९३४
वार्षिक वर्गणी ३०० रुपये
या अंकाची किंमत रु.२०/-

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत



## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

*नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.



संपादकीय पत्रव्यवहार :
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).
फोन : (०२०) २५६७४०९३.

व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :
घ. वा. जोशी
व्यवस्थापक, नवभारत मासिक
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५, गंगापुरी,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा)
फोन : (०२१६७) २२०००६.



अनुक्रमणिका






# नवभारत

## मार्च २०१३

## अनुक्रमणिका

# मर्ढेकरी कवितेचे रूपगोपन

द. भि. कुलकर्णी

।। एक।।

अर्वाचीन मराठी साहित्यावर अधिराज्य गाजवीत आहे, ती निबंधशैली; आणि का नाही गाजवणार? निबंधकारांचा अधिकारच तसा होता आणि आहे; का नाही गाजवणार? लोकहितवादी-ज्योतिबा, चिपळूणकर पिता-पुत्र, टिळक-आगरकर, केळकर-केतकर, शेजवलकर-जावडेकर ही नुसती प्रातिनिधिक नावे झालीत; यांत आणखी कितीतरी नावे जोडता येतील; वाङ्मयेतिहासात ती लखाखत आहेतच. या निबंधकारांचे स्थान केवळ वाङ्मयेतिहासापुरते मर्यादित नाही, तर त्यांचे कार्य सामाजिक-सांस्कृतिक आणि राजकीय आहे. त्याचा वचक साहित्यसृष्टीवर पडणारच.

या निबंधांचे आणि या निबंधशैलीचे वैशिष्ट्य काय आहे? तर्कनिष्ठा, अनुमानप्रामाण्य, वस्तुनिष्ठा, वास्तवता. वैचारिकता, निबंध आणि निबंधशैली यांची ही भूषणेच नाहीत, तर ती त्यांची व्यवच्छेदक मूल्येच आहेत. 'मराठी निबंधाने महाराष्ट्र घडविला' असे डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे म्हणतात, ते उगाच नाही!

पण याच निबंधगुणांनी मराठी ललित वाङ्मयाची हानी केली आहे. समग्र मराठी ललित, वाङ्मयावर या निबंधधर्माची छाया पडली आहे. केशवसुती कविता, वरेरकरी कादंबरी, मुक्तिबोधी काव्य, तेंडुलकरी स्वगते, जीएंची रूपककथा ही त्याची काही ठळक उदाहरणे होत. ललित वाङ्मयाची भाषा अर्थवलयांची भाषा असते, हेच हे ललित साहित्य विसरले– बालकवी, लक्ष्मीबाई टिळक, बहिणाई चौधरी, माडगूळकरबंधू, उद्धव शेळके, विश्राम बेडेकर, म. म. देशपांडे, श्रीनिवास विनायक कुलकर्णी ही उदाहरणे नजरेसमोर असूनही; आणि अर्थात मर्ढेकर.

या निबंधाघातामुळे मराठी ललित लेखन 'वास्तवाचे तर्कशुद्ध निवेदन' या प्रयोजनात गुंतून पडले; त्याला 'लालित्य' या आत्मतत्त्वाचे विस्मरण झाले; मग त्यात जे लालित्य आले ते तंत्राचे, अभिव्यक्तीचे, शब्दशैलीचे. माडखोलकर-खांडेकर-फडके यांचे लेखन याची साक्ष देते. लेख्य अनुभवाची आतून म्हणजे त्या अनुभवाच्या केंद्रस्थानातून अनुभूती न घेता त्याला आपल्या मनश्चक्षूपुढे वस्तुनिष्ठ स्वरूपात उभे करून दुरून आणि बाहेरून त्याला निरखायचे आणि अनुमानपद्धतीने त्याचे कथन करायचे, ही या निबंधनिष्ठ ललित लेखनाची प्रवृत्तीच झाली. असे लेखन वैचारिक क्षोभ वाचकाच्या मनात निर्माणच कसा करील? मग असे लेखन बोधवादी, बाळबोध झाल्यास आश्चर्य कसले? असे साहित्य 'ना निबंध, ना ललित' असे होते.

अशा समाजोपयोगी, तर्कप्रधान, निबंधशैलीतील तथाकथित ललित लेखनाविरुद्ध प्रतिक्रिया म्हणून रोमँटिक ललित साहित्याला भरती येते. वामन मल्हार-केतकर-वरेरकर यांच्या मागोमाग माडखोलकर-खांडेकर-फडके यांच्या कादंबऱ्या येतात, हा योगायोग नव्हे.

या उंच-सखल वाङ्मयीन नकाशाच्या पार्श्वभूमीवर कै. बाळ सीताराम मर्ढेकर यांच्या काव्यकर्तृत्वाचा अचूक बोध होतो.

।। दोन।।

वीस मार्च एकोणीसशे छप्पन्न ही मर्ढेकरांची निधन-तिथी आहे. 'शिशिरागमा'मध्ये जरी त्यांनी माधव जूलियन यांच्या रोमँटिक काव्याचे अनुकरण केले, तरी 'काही कविता' आणि 'आणखी काही कविता' या संग्रहांत ते या अनुकरणातून मुक्त झाले; निव्वळ मुक्तच झाले नाहीत, तर त्याविरुद्ध मूक बंडच त्यांनी पुकारले. या अर्थाने ते ज्ञानेश्वर आणि केशवसुत यांच्यानंतरचे 'बडे बंडवाले'च होते.

रोमँटिक कवींना सौंदर्यदर्शक शब्द आणि नादमधुर शब्द यांचा मोह असतो. बोरकर-पाडगावकर-सुरेश भट-ग्रेस-महानोर ही त्याची उदाहरणे होत. मर्ढेकरांनी अशा सौंदर्यदर्शक शब्दांचा आणि नादमधुर शब्दांच्या विरोधात

अनुक्रमणिका

बंडच पुकारले; त्यांनी आग्रह धरला अर्थसमृद्ध शब्दांचा-त्याला ते 'प्रसरणशील शब्द' म्हणत. प्रतिष्ठित सभेत आणि कवितेत जे शब्द उच्चारायला नागर समाज कचरेल, असे कुल्ले-नंगे, संडास-भंगी असे शब्द मर्ढेकरांनी आपल्या काव्यात बिनदिक्कत वापरले; मग, श्रीकेक्षींचा क्षोभ होणारच! गंमत म्हणजे क्षीरसागर-मर्ढेकर दोघेही स्वत:स 'सौंदर्यवादी' म्हणवीत असत! मर्ढेकरांचा हा भाषिक बंडावा रविकिरण मंडळीय काय आणि कुसुमाग्रज-बोरकर-काणेकर-लोवलेकर काय यांच्या पटलावर गडदपणे उठून दिसतो. आज दलित साहित्य आणि स्त्रीनिष्ठ साहित्य यांच्या तुलनेत मर्ढेकरांचा बंडावा काहीच नाही असे वाटते; पण हा बंडावा केवळ शब्दनिष्ठ नव्हता, वाक्यनिष्ठही होता आणि त्याच्यामागे समाजसापेक्ष नव्हे, तर साहित्यसापेक्ष प्रयोजन होते; जसे, 'पिपात मेले ओल्या उंदीर' ही ओळ दुसऱ्या कुठल्याही कवीने 'ओल्या पिपात मेले उंदीर' असा शब्दक्रम ठेवून सुबोध वाक्य तयार केले असते; मग मर्ढेकरांनी असे का केले? त्यांना आपली कविता मुद्दाम दुर्बोध करायची होती की त्यांना तऱ्हेवाईकपणाची हौस होती? नाही. त्यांना कवितेचे विधानरूप नाकारून तिला निबंधमुक्त करायचे होते. मी तार्किक विधान करीत नसून 'काव्यात्म विधान' करीत आहे, असे ही कविता आपणांस सांगते आहे; म्हणजे काय?

मर्ढेकर बुद्धिमान, व्यासंगी आणि तर्कदक्ष होते, हे त्यांच्या सौंदर्यशास्त्रीय लेखनातून स्पष्ट जाणवते; पण इथे ते 'कवी' आहेत. कवितेत जीवशास्त्रीय भावना असतात, तर्क असतो; पण कवितेची निर्मिती व कवितेचा आस्वाद सौंदर्यभावनेतून होत असतो, अशी त्यांची भूमिका होती. सौंदर्य आणि सौंदर्यभावना यांचा उदय लयबंधातून होत असतो; लयाचा प्रत्यक्ष प्रत्यय येत नसतो तर त्याचे कार्य असे सौंदर्य याचाच प्रत्यय येतो, असेही त्यांचे सांगणे होते. निबंधशैली तर्कतत्त्वावर आधारित असते व तिच्यातून सत्य प्रतीत होते; तर ललित शैली लयतत्त्वावर आधारित असते व तिच्यातून सौंदर्य प्रतीत होते, हे त्यांचे प्रतिपादन प्रसिद्धच आहे.

हे सौंदर्यही सौंदर्यदर्शक शब्दांवर (जसे, व्यवहारात सुंदर समजल्या जाणाऱ्या वस्तू, भावना इ.) किंवा नादमधुर शब्दांवर-वाक्यांवर अवलंबून नसते; ते अवलंबून असते आशयाच्या-अर्थाच्या लयबद्ध घाटावर आणि अंतिम मूल्याशी असणाऱ्या त्याच्या संबंधावर. मर्ढेकरांच्या अनेक कविता विकट किंवा विद्रूप अभिव्यक्तीच्या का आहेत, ते आता लक्षात येईल. अहो, त्यांना शब्दाच्या नादाचे, वाक्याच्या डौलदारपणाचे, अभिव्यक्तीच्या सुबकपणाचे अगत्य नव्हतेच; तशा कविता त्यांनी उमेदवारीच्या काळात. 'शिशिरागमा'च्या काळात लिहिल्या होत्याच; पण त्यांचा आवडता संग्रह तो नव्हता तर त्यानंतरचा 'काही कविता' हा होता; ज्यात 'बडबीत टिऱ्या', 'पिपात मेले', 'पोपटपंची चतुर्कि जान्', 'त्रुटित जीवनीं'. 'फलाटदादा', 'काळ्या बंबाळ अंधारी', 'कणा मोडला', 'गोंधळलेल्या अन् चिंचोळया', 'हाडांचे सापळे', 'वावडी वाह्यात माझी!', 'पंक्चरली जरि रात्र दिव्यांनी', अशा कितीतरी खास मर्ढेकरी कविता आहेत. 'मर्ढेकरी कविता' म्हणजे काय? अर्वाच्य शब्दांच्या? दुर्बोध? महानगरीय? यंत्रयुगसापेक्ष? नाही रे, बाबा! हे सारे आणि यापेक्षाही आणखी काही मर्ढेकरी कवितेत आहे; पण या साधनघटकांचे प्रयोजन कवितेला निबंधशैलीमुक्त, तर्कमुक्त करणे हे आहे. खरेतर मर्ढेकरी कवितेइतकी विचारनिष्ठ, चिंतनशील कविता आधुनिक मराठीत दुसरी नाहीच. अहो, तर्क-अनुमान-ज्ञान हे घटक आशयाचे अंश म्हणून येणे आणि तर्क-अनुमान-ज्ञान हे निर्मितीचे उपादानकारण असणे, या दोन गोष्टी वेगळ्या आहेत. कळलं? मर्ढेकरी काव्यातील व्यक्तिरेखा, यंत्रप्रतिमा, महानगरीय चित्रण हे सारे प्रतीकात्मक आहे.

मर्ढेकरी कविता सर्वार्थाने वास्तववादी आणि अँटी--रोमँटिक कविता आहे. अशी निखळ अँटी-रोमँटिक कविता मर्ढेकरांनंतर कुठल्याच मराठी कवीने लिहिली नाही; त्यांचे भ्रष्ट आणि निकृष्ट आणि सदोष अनुकरण मात्र य. द. भावे-वसंत हजरनीस-द. चिं. सोमण इत्यादी कवींनी केले आहे. याला आंशिक अपवाद आहे. दलित कविता–विशेषत: नामदेव ढसाळ आणि यशवंत मनोहर यांची कविता त्यांत भाषिक विद्रोहही आहे आणि सौंदर्यभानही आहे. मर्ढेकरांची कविता आडवी (म्हणजे कवीच्या व्यक्तित्वाशी निगडित) नसून उभी (म्हणजे स्वत:चे अस्तित्व आणि व्यक्तित्व कविनिरपेक्षपणे निर्माण

करणारी) आहे, हे यांच्या लक्षात आलेले नाही; पण ते कोणाच्या लक्षात आले? (तसे झाले असते तर मराठीत मर्ढेकरांची मानसशास्त्रीय व चरित्रात्मक समीक्षा लिहिली गेली असती? सांगा.) म. म. देशपांडे, वसंत आबाजी डहाके, दिलीप पुरुषोत्तम चित्रे हे आंशिक अपवाद आहेत.

हे काहीच नाही.

मर्ढेकरांच्या आधी मराठीत गेय, सुबोध, विधाननिष्ठ, गोडगोड भावनांचे दर्शन घडविणारे काव्य लोकप्रिय होते. आपल्या प्रतिभाबळाने मर्ढेकरांनी मराठी काव्याचा मोहरा वास्तवनिष्ठ सौंदर्यवादाकडे वळविला; पण आज अशी अवस्था आहे, की कवी आणि रसिक यांना पुन्हा गेय, गुळगुळीत, चिंतनशून्य, घोषवाक्यातील, सांकेतिक अनुभवाच्या कविता प्रिय होत आहेत. विदारक वास्तवापासून पळून मनोरंजनात गुंगण्याचा तर हा प्रकार नव्हे?

'वाङ्मयीन महात्मता' या निबंधाला जसा अजून वारसदार मिळाला नाही, तद्वत 'मर्ढेकरी कविते'लाही अजून खरा वारसदार लाभलेला नाही. जे मर्ढेकरांच्या चोरलवाटेने चालताहेत, त्या साठोत्तरी कवींनी या साऱ्याचा चौफेर विचार करावा.












# कोशवाङ्मय : महाराष्ट्राचा बौद्धिक मानदंड

सु. रा. चुनेकर

विद्यार्थी, अभ्यासक, संशोधक जेव्हा एखाद्या विषयाच्या अभ्यासाला आरंभ करतो, तेव्हा त्याच्या अभ्यासाचे पहिले आणि महत्त्वाचे साधन 'कोशवाङ्मय' हे असते. याच्या आधाराने नंतर त्याची पुढची वाटचाल सुरू राहते. कोशवाङ्मयाचे स्थूल मानाने चार वर्ग करता येतील : (१) शब्दकोश, (२) ज्ञानकोश (किंवा विश्वकोश), (३) कोशसदृश वाङ्मय आणि (४) सूचिवाङ्मय. यांपैकी पहिल्या तीन वर्गांचा एक गट करता येतो; 'सूचिवाङ्मय' हा एका प्रकाराने कोशवाङ्मयाशी संलग्न करता येईल असा विषय आहे. प्रस्तुत लेखात पहिल्या गटाचा, त्यातही 'ज्ञानकोशा'चा विशेष विचार केला आहे. 'सूचिवाङ्मय' हा विषय या लेखाच्या मर्यादेबाहेर ठेवला आहे.

'ज्ञानकोशा'[१] मध्ये ज्ञानाचे जे अनंत विश्व आहे, त्याचे संकलन असते. 'ज्ञानकोश' रचण्याची कल्पना अव्वल इंग्रजीपासूनच मराठीत रुजत होती. १९२० पर्यंत 'ज्ञानकोश'रचनेचे काही मर्यादित, अपुरे प्रयत्न झाले. 'ज्ञानकोश' रचण्याचा सर्वांत महत्त्वाचा, पूर्णत्वाला गेलेला उपक्रम म्हणजे डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर यांनी अन्य सहकाऱ्यांच्या साहाय्याने सिद्ध केलेला 'महाराष्ट्रीय ज्ञानकोश' हा बृहद्, सर्वव्यापी कोश. १९२० ते १९२७ या सात वर्षांत तेवीस भागांत तो 'ज्ञानकोश मंडळा'ने प्रकाशित केला. लो. टिळकांनी भारतीय स्वातंत्र्यासाठी संघर्ष केला, त्याच तोडीचा हा महाराष्ट्राच्या बौद्धिक स्वातंत्र्याच्या प्रस्थापनेसाठी डॉ. केतकरांनी 'महाराष्ट्रीय ज्ञानकोशा'चा उपक्रम केला. 'माझा मराठी माणूस ज्ञानाच्या क्षेत्रात जागतिक नागरिकांच्या मांडीला मांडी लावून बसला पाहिजे', अशी स्वाभिमानाधिष्ठित भूमिका डॉ. केतकरांची होती. पाश्चिमात्य आधुनिक संस्कृती आणि परंपरागत भारतीय संस्कृती यांचा समुचित संयोग 'महाराष्ट्रीय ज्ञानकोशा'त साधलेला होता. 'महाराष्ट्रीय ज्ञानकोशा'ने महाराष्ट्रात कोशवाङ्मयाचे युग सुरू केले आणि कोशकारांचीही उज्ज्वल परंपरा निर्माण केली. भारतीय कोशकार्यामध्ये महाराष्ट्रीय कोशकार्य अग्रस्थानी आहे.[२]

'महाराष्ट्रीय ज्ञानकोशा'नंतर कमीजास्त महत्त्वाचे, लहानमोठे अनेक कोश निर्माण झाले; परंतु 'महाराष्ट्रीय ज्ञानकोशा'च्या तुलनेत त्यांचा आवाका मर्यादित होता आणि बव्हंशी त्यांचा आधार 'महाराष्ट्रीय ज्ञानकोश'च होता.

डॉ. केतकरांच्या 'महाराष्ट्रीय ज्ञानकोशा'नंतरचा सर्वसमावेशक ज्ञानकोशरचनेचा व्यापक प्रकल्प म्हणजे लक्ष्मणशास्त्री जोशींच्या नेतृत्वाने वाई येथे सुरू झालेला आणि अजून सुरूच असलेला 'मराठी विश्वकोश'. या 'विश्वकोशा'चे काम महाराष्ट्र शासनाच्या पुरस्काराने, महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाच्या वतीने १९६२ मध्ये सुरू झाले. आत्तापर्यंत, गेल्या पन्नास वर्षांत त्याचे अठरा खंड प्रकाशित झाले. अठराव्या खंडाची अखेरची नोंद 'सह्याद्रि' आहे. महाराष्ट्राच्या आजच्या कार्यक्षमतेचे हे एक संतापकारक दुर्दर्शन!

'मराठी विश्वकोशा'शीच समांतर काळात काम चाललेला 'भारतीय संस्कृतिकोश' हा एक महत्त्वाचा संदर्भकोश. याचे प्रवर्तक व संपादक पंडित महादेवशास्त्री

---

१. डॉ. केतकरांनी आपल्या ज्ञानसंकलनात्मक कोशाला 'महाराष्ट्रीय ज्ञानकोश' म्हटले आहे. या कोशानंतरच्या बृहद्ज्ञानसंकलनात्मक कोशाला त्याचे संपादक लक्ष्मणशास्त्री जोशी यांनी 'विश्वकोश' म्हटले आहे. परंतु अशा कोशामध्ये 'ज्ञान' ही संकल्पना मूलभूत आहे. त्यामुळे 'ज्ञानकोश'हीच संज्ञा समर्पक ठरेल.

२. महाराष्ट्राच्या बौद्धिक स्वातंत्र्याच्या या उद्गात्याचे या पुण्यात उचित स्मारकही नाही. कमला नेहरू उद्यानात त्यांच्या नावाने एक चौथरा आहे; पण त्याच्यावर अर्धपुतळाही बसवण्याची कुणाला प्रेरणा होत नाही.

जोशी होते. या कोशाचा पहिला खंड १९६२ मध्ये प्रकाशित झाला आणि दहावा शेवटचा खंड १९७९ मध्ये प्रकाशित होऊन त्याची यशस्वी सांगता झाली. त्याचे पुनर्मुद्रणही झाले आहे. याच्या पहिल्या खंडाचे हिंदीमध्ये भाषांतरही झाले आहे. हा कोश भारतीय संस्कृतिकोश मंडळाने प्रकाशित केला आहे. याच मंडळाने 'मुलांसाठी भारतीय संस्कृतिकोश' चार खंडांत काढला आहे. महादेवशास्त्री जोशी यांचे चिरंजीव अशोक जोशी सध्या 'कृषिकोश' तयार करीत असून त्यांनी मंडळाचे काम पुढे चालू ठेवले आहे.

**चरित्रकोश**

ज्ञानकोशाचेच आणखी काही प्रकार म्हणता येतील असे काही विशिष्टशाखीय कोश असतात. अशा कोशांपैकी एक महत्त्वाचा कोशप्रकार म्हणजे चरित्रकोश. मराठीतील पहिला उल्लेखनीय चरित्रकोश म्हणजे रघुनाथ भास्कर गोडबोले यांचा 'भारतवर्षीय प्राचीन ऐतिहासिक चरित्रकोश' (१८७६). पुराणकालीन बावीसशे चौऱ्याऐंशी प्रसिद्ध भारतीय व्यक्तींची अल्पचरित्रे व स्थळे यांचा वर्णनात्मक असा हा सातशे पृष्ठांचा कोश आहे. पुढे १८८१ मध्ये अर्वाचीन काळातील व्यक्ती व स्थळे यांचा 'भरतखंडाचा अर्वाचीन चरित्रकोश' त्यांनी तयार करून प्रकाशित केला. हा सुपारे साडेपाचशे पृष्ठांचा आहे. या चरित्रकोशांनी मराठीतील चरित्रकोशांचा पाया घातला.

चरित्रकोश-वाङ्मयाचा उत्कर्ष म्हणजे सिद्धेश्वर-शास्त्री चित्राव यांचा 'भारतवर्षीय प्राचीन चरित्रकोश', 'भारतवर्षीय मध्ययुगीन चरित्रकोश' आणि 'भारतवर्षीय अर्वाचीन चरित्रकोश' हा त्रिखंडात्मक, त्रिकालात्मक बृहद्‌चरित्रकोश (१९३२ ते १९४६). या चरित्रकोशात सृष्टीच्या आरंभापासून इ. स. १९४५ पर्यंतच्या प्रमुख नामवंत व्यक्तींची चरित्रे ग्रथित झाली आहेत. तीनही खंड मिळून दोन हजार नऊशे पृष्ठे असून, त्यांत एकोणीस हजारांहून अधिक प्रमुख व्यक्तींची चरित्रे आली आहेत. संस्कृतिप्रसारणाच्या ध्येयधोरणातून या चरित्रकोशाची निर्मिती झाली आहे. 'भारतवर्षीय प्राचीन चरित्रकोशा'चे बाराशे पृष्ठांचे परिवर्धित हिंदी संस्करण १९६४ मध्ये प्रकाशित झाले आहे. भारतवर्षीय प्राचीन चरित्रकोशाच्या प्रथमखंडाची परिवर्धित, संस्कारित आवृत्ती १९६८ मध्ये प्रकाशित झाली आहे.

'भारतीय चरित्रकोशा'पेक्षाही व्यापक, विस्तृत आवाका असणाऱ्या 'मराठी विश्वचरित्रकोशा'चे काम श्रीराम पांडुरंग कामत यांनी केले आहे. या कोशाचे प्रत्येकी सुमारे एक हजार पृष्ठांचे सहा खंड प्रकाशित होऊन हा प्रकल्प पूर्ण झाला आहे. त्याचा पहिला खंड इ. स. २००० मध्ये प्रकाशित झाला आणि अखेरचा, सहावा खंड फेब्रुवारी २०१० मध्यें प्रकाशित झाला. पण या संकल्पपूर्तीचा आनंद अनुभवायला श्रीराम पांडुरंग राहिले नाहीत. सहावा खंड तयार झाला आणि आता तो प्रकाशित होणार, एवढ्यात श्रीराम पांडुरंगांचे निधन झाले (१५ फेब्रुवारी २०१०). त्यांच्या पश्चात तो (सहावा) खंड प्रकाशित झाला. या खंडाचे 'संपादकीय निवेदन'ही त्यांनी १४ फेब्रुवारीला लिहून ठेवले होते. या कोशात संस्कृतीच्या आरंभापासून विसाव्या शतकाच्या अखेरी-पर्यंतच्या काळातील सर्व देशांतील, विविध क्षेत्रांतील युगप्रवर्तक, क्रांतिकारक, विशेष कार्य करणाऱ्या सुमारे बारा हजार व्यक्तींच्या चरित्रांचा अंतर्भाव आहे.

श्रीराम पांडुरंग कामतांच्या 'विश्वचरित्रकोशा'च्या बऱ्याच पूर्वी गं. दे. खानोलकरांनी (गंगाधर देवराव खानोलकर, जन्म १९०३, मृत्यू १९९२) 'अर्वाचीन मराठी वाङ्मयसेवका'चा प्रकल्प सुरू केला होता. हा प्रकल्प अर्वाचीन मराठी साहित्यांतील साहित्यिकांवरील स्फुट चरित्रलेखनाच्या संग्रहाचा होता. यामध्ये ब्रिटिश अंमल सुरू झाल्यापासून मराठी वाङ्मयाची ज्यांनी संस्मरणीय सेवा केली, अशा दिवंगत वाङ्मयसेवकांची व त्यांच्या वाङ्मयाची पद्धतशीरपणे माहिती संकलित केली आहे. त्या त्या साहित्यिकांच्या लेखनाचा परिचय व परामर्श यांत आहे. (यातील काही लेख खानोलकरांनी अन्य अभ्यासकांकडून लिहून घेतले आहेत.) प्रत्येक चरित्रनोंदीच्या अंती त्या त्या वाङ्मयसेवकाच्या वाङ्मयाची सूची, चरित्र-चर्चा-अभ्यास यांची साधने दिली आहेत. मराठीमध्ये असा हा संदर्भाला अतिशय साहाय्यक उपक्रम पहिलाच आहे. १९३१ मध्ये 'अ. म. वाङ्मयसेवक'चा पहिला खंड प्रसिद्ध झाला; आणि १९६७ साली सातवा खंड प्रकाशित झाला. 'मागणीअभावी' पुढचे खंड निघाले नाहीत. सातवा खंड 'वरेरकर भा. वि.' पर्यंत येऊन

काम खंडित झाले. या कोशाच्या पहिल्या खंडाचे भाग १ व २ यांतून अंशात्मक पुनर्मुद्रण झाले. (अनुक्रमे १९५२, १९६६ मध्ये).

'अ. म. वा. सेवक'चे काम स्थगित झाले असले, तरी खानोलकरांचे या प्रकारचे काम चालूच होते. कर्मयोग्याच्या कामाला कधीच खळ नसतो. त्याचा वाग्यज्ञ अखंडित चालूच असतो. 'अ. म. वाङ्मयसेवका'चे काम खंडित झाले असले, तरी अधिक व्यापक, विस्तारित स्वरूपात ते चालू होतेच. आता ते अर्वाचीनापुरतेच मर्यादित न राहता प्राचीनापार्यंत पोचले होते, 'मराठी वाङ्मयसेवक, चरित्रकोश' या स्वरूपात. याचे दोन खंड खानोलकरांच्या निधनानंतर अथेना पब्लिशर्स, मुंबई ४००००४, या संस्थेने प्रकाशित केले. (यांची प्रकाशिका खानोलकरांची मुलगीच आहे, प्रिया आठवले.) खंड पहिला-मराठी ग्रंथकार, इ. स. १०३९ ते १९४०, आणि खंड दुसरा यांचा काळही १०३९ ते १९४० असाच आहे. या दोन्ही खंडांच्या सहसंपादक उषा टाकळकर आहेत. या दोन्ही खंडांचे प्रकाशन ४ मे २००३ चे (खानोलकरांचे जन्मशताब्दी वर्ष) आहे. या दोन खंडांत मिळून 'अकोलकर, गणेश विनायक' पासून 'घोसाळकर, इसहाक, शालोम' येथपर्यंतच्या साहित्यिकांच्या चरित्र-नोंदी आहेत. मराठीत असा वाङ्मयकोश पहिल्यांदाच निघत होता; पण दुर्दैवाने तो फार अपुरा राहिला. या दोन खंडांच्या पुढे खानोलकरांनी काम केले होते का, आणि ते प्रकाशात येणार का, याची कल्पना नाही, पण यावे असे मनोवांछित स्वप्न मात्र आहे. अशी अतिमहत्त्वाची कामे करायला शासनाकडे किंवा धनिकांकडे पैसा नाही आणि प्रेरणाही नाही; आणि दुसरीकडे एकामागून एक, एकाहून अधिक चढे पर्वत उभे राहत आहेत. हा काळच सामाजिक, सांस्कृतिक ऱ्हासाचा, अवनतीचा आहे. केव्हा, यातून महाराष्ट्र, राष्ट्र बाहेर पडणार, आणि पडणार तरी का, हे त्या (अस्तित्वात नसलेल्या?) परमेश्वरालाच माहीत!

खानोलकरांच्या 'वाङ्मयकोशा'त दिवंगत साहित्यिकांचा परिचय, त्यांच्या साहित्याच्या सूची आहेत. खानोलकरांच्या वळणाने नव्हे, पण मर्यादित प्रमाणात अनंत लक्ष्मण जोशी यांच्या 'मराठी सारस्वत'च्या दोन खंडांत विद्यमान लेखकांची चरित्रात्मक माहिती व त्यांच्या वाङ्मयनिर्मितीची सूची दिली आहे. प्राथमिक संदर्भसाधन म्हणून या साहित्यिकांच्या चरित्रांचा उपयोग आहे. 'मराठी सारस्वता'चे दोन खंड असून पहिला खंड १९८६ मध्ये व दुसरा खंड १९९२ मध्ये प्रसिद्ध झाला. दोन्हो खंडांत मिळून सुमारे अडीच हजार विद्यमान (कोश प्रकाशित होण्याच्या काळापर्यंत) साहित्यिकांच्या नोंदी आहेत. ('डिसेंबर १९८४ पर्यंत ज्या विद्यमान व्यक्तींचे कोणत्याही विषयावर मराठीत किमान एक पुस्तक प्रकाशित झाले आहे, अशा व्यक्तीचा या सूचीत लेखक म्हणून समावेश करण्याचे धोरण निश्चित करण्यात आले.' – 'महाराष्ट्र सारस्वत' खंड १, 'भूमिका' पृ. अकरा.) बाबुराव अर्नाळकरांवरील नोंदीत त्यांच्या ९२८ पुस्तकांच्या नोंदी आहेत. (खंड १, पृ. ७ ते २८) यावरून अनंतराव जोशा यांनी किती साक्षेपाने, परिश्रमाने काम केले आहे, याची कल्पना येते. अलीकडे अनंतराव जोशी यांनी या कोशाच्या पुरवणीचे काम हाती घेतले होते; पण या कामाला आकार येत असतानाच दुर्दैवाने, अनंतरावांचे आकस्मिक देहावसान झाले. (जन्म २५ मे १९३८, मृत्यू २१ ऑगस्ट २०११).

**वाङ्मयकोश**

मराठीमध्ये तीन महत्त्वाचे वाङ्मयकोश झाले-काही अपुऱ्या अवस्थेत आहेत. यांपैकी पहिला वाङ्मयकोश नागपूर विद्यपीठाच्या स्नातकोत्तर मराठी विभागाने योजलेला 'मराठी वाङ्मयकोश'. या योजनेतील पहिला खंड, 'प्राचीन खंड' तेवढा प्रकाशित झाला आहे (१९७४). डॉ. अ. ना. देशपांडे मुख्य संपादक आणि डॉ. वि. बा. प्रभुदेसाई, प्रा. म. शं. वाबगावकर, डॉ. द. भि. कुलकर्णी व प्रा. म. रा. जोशी हे संपादक आहेत. नागपूर विद्यापीठाचे हे प्रकाशन आहे. हा खंड मराठी भाषा व वाङ्मय यांच्या आरंभापासून इ. स. १८५० पर्यंतच्या नऊ-दहा शतकांच्या वाङ्मयापुरता मर्यादित आहे. मुख्य संपादकांच्या प्रास्ताविक दोन शब्दांत 'प्राचीन काळापुरते काम संपले. आधुनिक भागाचे काम सुरू आहे'. असे आश्वासन आहे; परंतु ते प्रत्यक्षात उतरले नाही. या कोशापूर्वी मराठी वाङ्मयाचे इतिहास अनेक झाले, पण वाङ्मयकोश असा हा पहिलाच हे याचे श्रेय

निःसंशय आहे.

सामान्यतः अकराव्या शतकापासून १८५० पर्यंतच्या कालखंडातील ग्रंथकार व ग्रंथ यांचा हा कोश आहे. इतिहास हा सलग, अखंड ग्रंथ असतो; कोश हा आवश्यक ते संदर्भ पुरवणारा संकलित ग्रंथ असतो. दोन्हीही अभ्यासाला आवश्यक व उपयुक्त साधने आहेत. कोशामध्ये अभ्यासकाला हवा असलेला व्यक्ती, ग्रंथ, विषय यांचा संदर्भ चटकन आणि नेमका मिळतो. नागपूर विद्यापीठाच्या या वाङ्मयकोशाचे चार विभाग आहेत– (१) ग्रंथकार-विभाग, (२) ग्रंथ व किरकोळ रचना, (३) पुरवणी : ग्रंथकार-विभाग, (४) पुरवणी : ग्रंथ व किरकोळ रचना विभाग. या कोशाला अभ्यास व संशोधनपूर्ण चार परिशिष्टे आहेतः (१) काही वाङ्मयप्रकार व वृत्तप्रकार, (२) प्राचीन वाङ्मयाशी संबंधित असलेली महाराष्ट्रातील स्थळे, (३) प्राचीन मराठी वाङ्मयाशी संबंधित महाराष्ट्राबाहेरील स्थळे, (४) अनेक भाषांतून काव्यलेखन करणारे प्राचीन मराठी कवी. या चार परिशिष्टांनी कोशाची उपयुक्तता वाढली आहे.

यानंतरचा महत्त्वाचा मराठी वाङ्मयकोश म्हणजे महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचा 'मराठी वाङ्मयकोश'. (या वाङ्मयकोशाचे मूळ जनक थोर कोशकार, चरित्रकार गंगाधर देवराव खानोलकर; पण नंतर हा कोश साहित्य आणि संस्कृती मंडळाने दत्तक घेतला आणि अरब व उंट गोष्टीतल्याप्रमाणे खानोलकरांना बाहेर पडावे लागले. प्रत्यक्ष कोशांचा इतिहास हा जसा महत्त्वाचा, तसाच कोशकार्यामागील इतिहास हाही लिहिण्यासारखा आणि उद्‌बोधक ठरेल.) नागपूर विद्यापीठाच्या वाङ्मयकोशानंतर तीन वर्षांनी या कोशाचा पहिला खंड प्रकाशित झाला असला, तरी हा कोश अधिक सुनियोजित, व्यापक स्वरूपाचा आहे (प्रकाशन १९७७). या कोशाचा प्रत्यक्ष प्रारंभ ऑगस्ट १९६८ मध्ये झाला असला, तरी खानोलकरांच्या मनात या कोशाची कल्पना या आधी अनेक वर्षे चालू होती. खानोलकरांची या कोशाची योजना मूळ सहा खंडांची होती; पण सा. सं. मंडळाने ती हातात घेतल्यावर चार खंडांची बनली. ही विभागणी पुढेही कायम राहिली, पण पहिल्या खंडानंतर या कोशाशी खानोलकरांचा संबंध राहिला नाही. पहिल्या खंडाचे लेखन, संपादन अतिशय साक्षेपाने, संशोधनपूर्वक झाले आहे.

या कोशाच्या चार खंडांची विभागणी पुढीलप्रमाणे होती–

खंड १ : इ. स. १८५७ पर्यंतच्या सर्व ज्ञात लेखकांचा समावेश या खंडात करण्यात आला आहे.

खंड २ : इ. स. १८५८ ते १९७५ या काळातील सर्वच ग्रंथकारांचा या खंडात समावेश न करता वाङ्मयाच्या भिन्न भिन्न शाखांतील निवडक ग्रंथकारांचा समावेश यात करण्यात आलेला आहे.

खंड ३ : गेल्या आठशे वर्षांत मराठी भाषेत जे वाङ्मय निर्माण झाले, त्यातील प्रातिनिधिक, महत्त्वाच्या निवडक ग्रंथांचा परिचय या खंडात करून द्यावयाचा होता.

खंड ४ : मराठीतील साहित्य व समीक्षा यांवरील लेखनाचा या खंडात परिचय करून दिला जाणार होता.

परिशिष्टे :

१. पंथप्रवर्तक व इतर काही व्यक्ती.
२. अनाम रचना.
३. पुरवणी.

(या एकूण कोशप्रकल्पसंबंधांत पुढे सुसूत्रता राहिली नाही. त्यात एवढ्या विसंगती आल्या आहेत, की त्यांचा परामर्श घेण्यासाठी स्वतंत्रच लेख लिहायला हवा. पण प्रस्तुत लेखात तो विषय अप्रस्तुत ठरणारा असल्याने येथे फक्त त्याचा सूचक उल्लेख करून ठेवला आहे.)

पहिल्या खंडाच्या प्रस्तावनेत खानोलकरांनी लिहिले आहे. 'त्यानंतरच्या (इ. स. १८५८–१९७५) काळातील ग्रंथकारांविषयींचा मजकूर दुसऱ्या खंडात येईल.' परंतु प्रकाशित दुसऱ्या खंडाला 'खंड दुसरा, भाग एक' म्हटले आहे (पृष्ठ ३). तेथे 'मराठी ग्रंथकार (दिवंगत) इ. स. १८५८ ते ३० एप्रिल १९६०' या काळातील साहित्यिकांवर नोंदी असल्याचे म्हटले आहे. हा भाग (खंड २, भाग १) अत्यंत असमाधानकारक आहे.[३] याचे संपादक 'डॉ. गो.

---

३. या काळात म. रा. सा. सं. मंडळाचे अध्यक्ष प्रा. रा. रं. बोराडे होते. त्यांचा व माझा या संबंधात पत्रव्यवहारही झाला होता.

म. कुलकर्णी' असे मुखपृष्ठावरच छापले आहे. गो. म. कुलकर्णी डॉ. नव्हते. गलथानपणाला येथूनच सुरुवात झाली आहे. हा झाला प्रारंभ. आता शेवटच्या पृष्ठावरील 'श्रीखंडे, शंकर चिंतामण' नोंद पाहावी. ही नोंद स्वतः गो. म. कुलकर्णी यांनी लिहिली आहे. यात 'शंकर चिंतामण' आणि 'रामचंद्र चिंतामण' या बंधुद्वयावरील माहितीची येथे भेसळ केली आहे आणि ही नोंद झाली आहे 'शंकर चिंतामण' यांच्या खात्यावर. शंकर चिंतामण यांचे स्वतंत्र लेखन अल्प आहे आणि आहे ते 'वाङ्मय-श्री-खण्ड'[४] या कौटुंबिक स्वरूपाच्या संकलनात मराठी साहित्यात ज्यांची कामगिरी अधिक आहे, ती रामचंद्र चिंतामणांची. 'सुश्र्लोक श्रीखंडे' या नावाने ते जाणकारांत प्रसिद्ध होते. त्यांचेही श्रेय शंकर चिंतामणांच्या नावावर जमा झाले आहे.

खानोलकरांनी ज्या वाङ्मयकोशांचा कणखर पाया घातला, त्याची ही अक्षम्य विटंबना आहे. खुद्द खानोलकरांवरच यात नोंद नाही. आणखी एकच उदाहरण, आणि मग हा खंड बंद करायचा : 'पटवर्धन, माधव त्र्यंबक' : पावणेदोन पृष्ठांची ही नोंद. एवढ्याशा नोंदीसाठी सु. रा. चुनेकर, म. ना. लोही, गो. म. कुलकर्णी हे तीन समीक्षक खर्ची घातले आहेत. माधवराव पटवर्धनांचे सखोल अभ्यासक म्हणून सु. रा. चुनेकरांचे नाव जाणकारांमध्ये मान्य आहे. त्याला आणखी दोन डब्यांची जोड कशाला? आणि या एवढ्याला नोंदीत अनेकानेक चुका आहेत. अशा नोंदीत समीक्षकयीत आपले नाव असावे, याची चुनेकरांना लाज वाटावी!

असली कामे जाता जाता करण्यासारखी नसतात. त्याला जन्मभर वाहून घ्यावे लागते.

खंड दोनचा(चे) पुढचा(चे) खंड आणि खंड तीन निघाला असल्याचे मला माहीत नाही; एकदम चौथा खंड निघाला असावा. चिं. वि. जोश्यांच्या 'चिमणरावाचे चऱ्हाट'मधील एका अप्रतिम विनोदाची येथे आठवण होते. चिमणरावाला सिगरेट ओढायची आहे. सिगरेट पेटवण्यासाठी एक काडी ओढतो. वाऱ्याच्या झोतानं ती विझते; दुसरी ओढतो, तीही विझते; मग तिसरी न ओढताच चौथी ओढतो.

म. रा. सा. संस्कृती मंडळाच्या वाङ्मयकोशाचा चौथा खंड 'समीक्षा-संज्ञा खंड'. याच्या समन्वयक संपादक विजया राजध्यक्ष आहेत. हा चौथा खंड खानोलकर-संपादित पहिल्या खंडाशी नाते सांगणारा आहे. या खंडाच्या 'प्रस्तावने'त या संज्ञाकोशाची उद्दिष्टे सांगितली आहेत : 'मराठी समीक्षाव्यवहारात योजल्या गेलेल्या, किंवा आज प्रचलित असणाऱ्या सर्वच्या सर्व संकल्पना-संज्ञांचा परिचय करून देणे हे या कोशाचे उद्दिष्ट नाही. संस्कृत साहित्यशास्त्र, पाश्चात्त्य साहित्यशास्त्र यांमधील मराठी समीक्षाव्यवहाराशी संबंधित तसेच मराठीत स्वतंत्रपणे रूढ अशा महत्त्वाच्या संज्ञांचा आटोपशीर परिचय करून देणे हे या कोशाचे उद्दिष्ट आहे. याबरोबरीनेच विद्यार्थी, प्राध्यापक, अभ्यासक, समीक्षक यांना उपयुक्त ठरेल असा एक संदर्भग्रंथ उपलब्ध करून देणे, भावी काळातील अशा प्रकारच्या कार्याला चालना देणे ही आणि या प्रकारची काही उद्दिष्टेही आमच्यासमोर होती.' (पृ. दहा) आणि या कोशात ती बव्हंशी साध्यही झाली आहेत. या कोशाला उपयुक्त व मार्गदर्शक ठरतील अशी तीन परिशिष्टे जोडली आहेत: (१) परिभाषासूची, (२) संदर्भग्रंथसूची, (३) नोंद-विषयसूची. अशा प्रकारच्या कोशाची अंगभूत मर्यादाही या 'प्रस्तावने'तच सांगितली आहे. 'अशा कोशाचे कार्य मर्यादितच असते हेही सांगितले पाहिजे. या कोशातून अमुक एका संज्ञेचा अर्थ काय, तिचे उपयोजन कसे केले गेले आहे हे कळेल; परंतु तिच्या उपयोजनाच्या आणखी काही शक्यता आहेत का, यासारख्या प्रश्नांची उत्तरे मात्र वाचकाने सतत (स्वतः?) शोधली पाहिजेत. या प्रेरणा देण्याचे कार्य कोणताही चांगला कोश करू शकतो.' (प्रस्तावना, पृ. १३).

या कोशाचे संपादक-मंडळही साहित्यातील प्रस्थापित, व्यासंगी अभ्यासक लेखकांचे आहे.

साहित्यविषयक समज सुजाण होण्यात प्रस्तुत 'समीक्षा-संज्ञा कोश' साहाय्यक होणार आहे. पुरेशा प्रामाणिकपणाने, गांभीर्याने 'मराठी वाङ्मयकोशा'चा हा चौथा खंड सिद्ध झाला आहे.

४. वाङ्मय-श्री-खण्ड, संपादक व प्रकाशक : डॉ. रामचंद्र चिंतामण श्रीखंडे, १९३२, पृ. ५२+११५+१३३ (एकूण पृष्ठें ३००), २ रु.










शेवटी, एक गंमत (आता ती गंमतच म्हणायची!). या वाङ्मयकोशाचे मूळ संकल्पक, प्रवर्तक, संयोजक, संवर्धक, यांतील पहिल्या खंडाचे जाणकार, अनुभवी संपादक गंगाधर देवराव खानोलकर यांच्या ऋणाचा उल्लेख मात्र खंड २, भाग १ किंवा समारोपाचा खंड ४ (यात तीन पृष्ठे 'ऋणनिर्देशां'ची असूनसुद्धा) यामध्ये नाही.

साहित्य संस्कृती मंडळाच्या 'मराठी वाङ्मय-कोशा'च्या आसपासच आणखी एका महत्त्वाच्या वाङ्मयकोशाचे काम चाललेले होते. हा वाङ्मयकोश म्हणजे 'संक्षिप्त मराठी वाङ्मयकोश'. या कोशाचे काम जी. आर. भटकळ फाउंडेशन, मुंबई, या संस्थेच्या वतीने चाललेले होते. या संक्षिप्त वाङ्मयकोशाचे संकल्पक, संवर्धक होते पॉप्युलर प्रकाशनाचे सदानंद भटकळ. या वाङ्मयकोशाच्या पहिल्या खंडाचे संपादक होते जया दडकर, प्रभा गणोरकर, वसंत आबाजी डहाके, सदानंद भटकळ सहकारी संपादक होते. रमेश ना. वरखेडे, उषा टाकळकर. प्रकाशन ९ सप्टेंबर १९९८. हा खंड आरंभापासून १९२० पर्यंतच्या वाङ्मयाही संबंधित आहे. दुसऱ्या खंडाचे संपादक आहेत. प्रभा गणोरकर, उषा टाकळकर, वसंत आबाजी डहाके, जया दडकर, सदानंद भटकळ. यांत १९२० पासून २००३ पर्यंतचा कालखंड व्यापला आहे; प्रकाशन : फेब्रुवारी २००४, खंड तिसरा 'वाङ्मयीन संज्ञा-संकल्पना कोश' आहे. प्रकाशन डिसेंबर २००१ (संपादकांनी यांना खंड-क्रमांक दिलेले नाहीत. तिसरा खंड दुसऱ्या खंडापूर्वी प्रकाशित झाला आहे, परंतु विषयसाधर्म्याच्या दृष्टीने येथे लावलेला क्रम स्वीकारार्ह वाटतो.) संपादक प्रभा गणोरकर, वसंत आबाजी डहाके, जया दडकर, सदानंद भटकळ, आशा राजवाडे, रमेश वरखेडे. पहिल्या खंडात (आरंभापासून १९२० पर्यंतचा कालखंड) या कालखंडात 'आरंभ-काळापासून १९२० पर्यंतचा कालखंडातील वाङ्मयाचा व्याप फार मोठा आहे. या काळात वाङ्मयाचे अनेक आविष्कार दिसतात. वाङ्मयाची बहुविध वळणे दिसतात. हा कोश या सर्वसमावेशक वाङ्मयविश्वाचे विविध अंगी स्वरूप थोडक्यात वाचकांपुढे उलगडून ठेवतो. यात बहुविध साहित्यप्रकार, पंथ, संप्रदाय, नियतकालिके, साहित्य व नाट्यसंमेलने, साहित्य संस्था व प्रसारक या सर्वांची दखल घेतली आहे.

'या कोशात ग्रंथकारांसंबंधी माहिती तर आहेच, शिवाय त्यांच्या उल्लेखनीय साहित्यकृती. साहित्यविश्वात अहळ स्थान मिळालेल्या कादंबऱ्या, नाटके, कविता, कथा यासंबंधीही नोंदी आहेत. लेखन, मुद्रण, प्रकाशन व वितरण या वाङ्मयव्यवहाराच्या चार पायऱ्यांशी निगडित अशा व्यक्ती व संस्था यांच्याही नोंदी केल्या आहेत'. (मुखपृष्ठामागील पट्टीवरील मजकूर) या खंडाला दोन परिशिष्टे आहेत : (१) अधिक अध्ययनासाठी निवडक ग्रंथाची सूची, (२) ग्रंथकारांची कालक्रमानुसार निर्देशसूची.

'संक्षिप्त मराठी वाङ्मयकोशा'च्या दुसऱ्या खंडात १९२० ते २००३ पर्यंतचा कालखंड आला आहे. १९२० ते २००३ अखेरपर्यंतच्या कालखंडातील ग्रंथ, ग्रंथकार, प्रकाशक, नियतकालिके, वाङ्मयीन चळवळी यांविषयीच्या नोंदी असलेला संक्षिप्त मराठी वाङ्मयकोशाचा हा खंड म्हणजे मराठी वाङ्मयजगताचे सम्यक् चित्र प्रस्तुत करणारा महत्त्वाचा दस्तऐवज आहे.' (मुखपृष्ठामागील पट्टीवरील मजकुरातून)

पहिल्या, दुसऱ्या खंडांमध्ये काही चुका, उणिवा राहिल्या आहेत.[५] अशासारख्या मोठ्या प्रकल्पात काही उणिवा, दोष (राहू नयेत, पण) राहणे स्वाभाविक आहे. पण या कोशनिर्मितीमागील सदानंद भटकळांची प्रेरणा प्रामाणिक, शुद्ध होती; त्यासाठी त्यांनी, प्रकृतीच्या प्रतिकूलतेतहि अपार परिश्रम घेतले. त्यांच्या मनामध्ये झालेल्या चुका. दोष दूर करणारा पुरवणी खंड काढावा असे होते. प्रकृती तर असहकार करीत होतीच, पण बाहेरूनही फारसा प्रतिसाद मिळाला नाही आणि ही सल मनात ठेवूनच त्यांचे अठ्ठ्याऐंशीव्या वर्षी निधन

५. खंड प्रकाशित होताच मी स्वतः सदानंद भटकळांना या खंडातील दोष, उणिवा दाखवणारी दोन-तीन पत्रे पाठवली होती.

ग. रा. फाउंडेशनच्या 'संक्षिप्त मराठी वाङ्मय-कोशाच्या निमित्ताने– अनंत देशमुख, 'साहित्य' दिवाळी अंक २००५, पृ. १२० ते १३०. तीव्र प्रतिकूल टीका, चुका, त्रुटी, दोष दाखवणारा विस्तृत लेख.

झाले (२७ जुलै २०१०). परंतु दुसऱ्या खंडाला, मुख्य कोश पुरा झाल्यावर 'पुरवणी आणि पुस्ती' जोडली आहे (पृ. ७७१-७९०). या खंडाला सहा परिशिष्टे जोडली आहेत. ती बघितल्यानंतरही लक्षात येते भटकळांची दृष्टी किती व्यापक होती. ते या परिशिष्टांमुळे या कोशाची उपयुक्तता वाढली आहे, ही परिशिष्टे अशी : १. 'पुरस्कार', १.१ साहित्य अकादमी पुरस्कार, १.२ महाराष्ट्र फाउंडेशन पुरस्कार; १.३ महाराष्ट्र साहित्य परिषद पुरस्कार. (यातच 'प्रा. रा. श्री. पुरस्कारा'चा अंतर्भाव केला आहे. त्याचे स्वरूप वेगळे, स्वतंत्र आले. अलीकडे या पुरस्कार-निर्णय व प्रदान यांत गलथानपणा आला आहे.) १.४ महाराष्ट्र राज्य शासन पुरस्कार; १.५ इतर पारितोषिके. परिशिष्ट २ : साहित्य संमेलने; परिशिष्ट ३ : नाट्यसंमेलने; परिशिष्ट ४ : मराठी प्रकाशन परिषद-संमेलन, परिशिष्ट ५ : अनियतकालिके; परिशिष्ट ६ : अधिक अध्ययनासाठी निवडक ग्रंथ.

'संक्षिप्त मराठी वाङ्मयकोश' या प्रकल्पाचाच एक भाग म्हणून 'वाङ्मयीन संज्ञा-संकल्पना कोश' काढला आहे. या खंडावर कुठेही 'संक्षिप्त मराठी वाङ्मयकोशा'चा उल्लेख नाही; पण 'प्रकाशकाचे निवेदन' मध्ये मात्र या कोशाचा 'खंड तिसरा' असा उल्लेख आहे (पृ. नऊ). 'संपादकीया'त या खंडाविषयी लिहिले आहे, 'एकूण साहित्यव्यवहारात साहित्यसिद्धांत आणि साहित्यसमीक्षा या व्यवहाराला महत्त्वाचे स्थान आहे. या व्यवहारातील निवडक संज्ञांचे आणि संकल्पनांचे स्पष्टीकरण करण्यासाठी या 'संज्ञा-संकल्पना' खंडाची निर्मिती झाली आहे... साहित्यसिद्धांत आणि साहित्य-समीक्षा हे एक शास्त्र आहे. या शास्त्राचे वाचकांना किमान प्राथमिक ज्ञान व्हावे ही दृष्टी नोंद लिहिताना बाळगलेली होती.' याला ग्रंथाच्या अखेरीला चार परिशिष्टे जोडली आहेत. त्यायोगे विषय आकलन होण्यास, अभ्यासास महत्त्वाची मदत होते. ती परिशिष्टे अशी : १. संज्ञा-संकल्पना : विषयानुसार अनुक्रम; २. संस्कृत, मराठी व पाश्चात्त्य साहित्यमीमांसक व समीक्षक; ३. निवडक इंग्रजी संज्ञांचे मराठी पर्याय. ४. संदर्भ-साहित्य आणि अधिक वाचनासाठी पुस्तके.

'संक्षिप्त मराठी वाङ्मयकोशा'च्या पहिल्या दोन खंडांना वसंत आबाजी डहाके यांच्या पूरक विस्तृत, विवेचक प्रस्तावना आहेत. पुढे या दोन प्रस्तावना एकत्र करून, 'मराठी साहित्य, इतिहास आणि संस्कृती' असा स्वतंत्र ग्रंथ प्रकाशित केला आहे. किंचित संस्कार करून[६] या मौलिक ग्रंथांत 'इतिहास, संस्कृती, साहित्य' हे अधिक, नवे चौथे प्रकरण जोडले आहे.' वाङ्मयीन संज्ञा-संकल्पना कोशा'लाही डहाके यांची सुदीर्घ प्रस्तावना आहे.

'संक्षिप्त मराठी वाङ्मयकोश' हा केवळ व्यावसायिक दृष्टी ठेवून काढलेला कोश नाही. गंभीर हौसेने, कर्तव्याच्या जाणिवेने काढलेला हा कोश आहे. मराठी भाषा व वाङ्मय याविषयीच्या चोखंदळ, जाणकार वाचकांना यात काही चुका आढळतील, पण त्याच्या निर्मितीमागील प्रांजळ तळमळ बघून असे वाचक म्हणतील 'क्षमस्व'.[७]

२०१० साली महाराष्ट्र राज्याच्या स्थापनेस पन्नास

---

६. मराठी साहित्य, इतिहास आणि संस्कृती -वसंत आबाजी डहाके, पॉप्युलर प्रकाशन प्रा.लि.,मुंबई ४०००३४. पृ. बारा+३०४;४५०रु.

७. या वाङ्मयकोशावरील काही अभिप्राय:

- संक्षिप्त मराठी वाङ्मयकोश - सुभाष भेंडे; 'ललित', जून १९९९. ('मानाचे पान'),
- 'संक्षिप्त मराठी वाङ्मयकोशा'संबंधी - नीती बडवे, भाषा आणि जीवन: १७:१, हिवाळा १९९९.
- 'मराठी वाङ्मयकोश' - गोविंद तळवलकर, 'ललित', जानेवारी २००८.
- सदानंद आणि आम्ही सगळे - प्रभा गणोरकर, 'ललित', सप्टेंबर २०११.
- 'संक्षिप्त मराठी वाङ्मयकोश' (त्रोटक परिचय), 'ललित', एप्रिल २००४. ('लक्षवेधी पुस्तके' सदरात).
- मराठीच्या समृद्ध कोशपरंपरेला लाभलेले अर्थपूर्ण योगदान - अविनाश सप्रे. 'रविवार सकाळ', १९ मे २००२.
- सर्वांगसुंदर संदर्भकोश - डॉ. प्रसाद वडेर, 'साप्ताहिक सकाळ', २७ जुलै २००२.
- अभ्यासकांना उपयुक्त कोश - उषा तांबे, 'महाराष्ट्र टाइम्स', ६ ऑक्टोबर २००२.

वर्षे झाली, या निमित्ताने अनेक उपक्रम झाले. त्यांतील एक महत्त्वाचा उपक्रम म्हणजे साप्ताहिक 'विवेक'चा 'आधुनिक महाराष्ट्राची जडणघडण : शिल्पकार चरित्रकोश'. याचा दुसरा खंड 'साहित्य' हा आहे. (प्रकाशन २० डिसेंबर २००९, संपादक डॉ. सुभाष भेंडे). 'गेल्या दोनशे वर्षांत महाराष्ट्रातील साहित्य-प्रवाहाने कसकशी वळणे घेतली व ती वळणे घेण्यास कोण कोण कारणीभूत ठरले याचा समग्र इतिहास या 'साहित्य खंडामध्ये' आला आहे. साधारणतः अठराशे ते दोन हजार या दोनशे वर्षांत जे महत्त्वाचे साहित्यिक झाले, त्या साहित्यिकांचा हा चरित्रकोश आहे. याला एकशेचौदा पृष्ठांची ज्येष्ठ समीक्षक प्रा. डॉ. विलास खोले यांची अभ्यासपूर्ण विवेचक प्रस्तावना आहे. ⊠ तिला विस्तृत संदर्भसूची आहे व अन्य अभ्यास ग्रंथाची यादी दिली आहे. प्रस्तुत कोशाचा उद्देश इ. स. १८०० ते २००० अशा दोनशे वर्षांतील निवडक मराठी ग्रंथकारांचे चरित्र व कार्य सांगावे असा आहे (प्रस्तावना, पृ. एकोणतीस). या खंडात सुमारे साडेपाचशे निवडक साहित्यिकांच्या चरित्राचा व साहित्यसंवेचा मागोवा घेण्यात आला आहे. ग्रंथाच्या शेवटी अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनांची यादी दिली आहे.

हा उपक्रम गंभीरपणाने करण्याचा संचालकांचा प्रयत्न आहे; पण तो तितकासा यशस्वी झाला नाही, असे म्हटल्याशिवाय राहवत नाही. अचूकता, निर्दोष परिपूर्णता या बाबतीत कोशात बऱ्याच उणिवा राहिल्या आहेत. अनेक अर्ध्याकच्च्या, अनभिज्ञ व्यक्तींकडून यातील नोंदी लिहवून घेतल्याने असे झाले असावे. खुद्द माझ्यावरील नोंदीत अनेक चुका झाल्या आहेत. माधव जूलियन (माधवराव पटवर्धन) यांच्यावर मी स्वतः लिहिलेल्या नोंदीमध्येही अनेक चुका झाल्या आहेत. संपादक-वर्गापैकी कुणाचा तरी हात या नोंदीवर फिरला असावा. [८]

**नाट्यकोश**

विसाव्या शतकाच्या अगदी अखेरीला (डिसेंबर २०००) डॉ. वि. भा. (विश्वनाथ भालचंद्र) देशपांडे यांचा लांबी-रुंदी-जाडीने भलामोठा असणारा 'नाट्यकोश' प्रकाशित झाला आहे. त्याला १३४ पृष्ठांची प्रस्तावना ('नांदी') आहे. वि. भा. देशपांडे यांची 'मराठी नाटक आणि रंगभूमी (पहिले शतक, १८४३ ते १९४३)', प्रकाशन १९८८, पृ. १०९, किं. ४५रुपये आणि 'मराठी नाटक : स्वातंत्र्योत्तर काल (१९४७ ते १९९०)', प्रकाशन १९९२, पृ. १६ + २४०, किं. १२० रु. (दोन्ही पुस्तकांचे प्रकाशक व्हीनस प्रकाशन, पुणे.) ही दोन्ही पुस्तके प्रस्तुत 'नाट्यकोशा'त जशीच्या तशी रिचवली आहेत. क्वचित् एखादा शब्द, एखादे वाक्य, एखादा परिच्छेद यांत किरकोळ बदल केला असेल इतकेच. प्रकाशकांकडे या पुस्तकांच्या प्रती शिल्लकही होत्या. 'नाट्यकोशा'त या गोष्टीचा उल्लेखही नाही. ही फार मोठी प्रतारणा, फसवणूक आहे. हे वेगळ्याच प्रकारचे वाङ्मयचौर्य आहे. या बाबतीत प्रकाशकांना कळवलेही नाही, विचारणे दूरच! त्या पुस्तकांच्या प्रस्तावना नोंदीत रिचवताना त्या २००० सालापर्यंत अद्ययावतही केल्या नाहीत. नमुना म्हणून जयवंत दळवींविषयीचा मजकूर बघता येईल. 'नांदी'त दळवींची सतरा नाटके असल्याचे म्हटले आहे. (पृ. ६४); पण गंमत म्हणजे तेथे सतरा क्रमांक आहेत, पण त्यात तेरा आणि चौदा क्रमांक गायबच आहेत. म्हणजे प्रत्यक्षात तेथे पंधरा नाटकांचीच नावे आहेत. या वेळेपर्यंत दळवींची येथे नोंद नसलेली नाटके : (१) 'मालवणी सौभद्र' (प्रथम-प्रयोग २६ सप्टेंबर १९८५), (२) किनारा (प्र. प्र. १ नोव्हेंबर १९८६), (३) 'नातीगोती' (प्र. प्र. ८ जून १९८९), (४) 'अपूर्णांक' (प्र. प्र. १३

---

८. 'आपलं महानगर'च्या रविवार दि. ११ मार्च २०१०च्या अंकात 'साहित्यिकांच्या चरित्रकोशाची झाडाझडती' हा डॉ. अनंत देशमुखांचा विस्तृत टीकालेख आला आहे आणि त्याला उत्तर देणारा 'बेजबाबदार समीक्षेची झाडाझडती' हा सुपर्णा कुलकर्णी यांचा संपादकांच्या वतीने उत्तर देणारा लेख 'आपलं महानगर'च्या बुधवार दि. ११ एप्रिल २०१०च्या अंकात आला आहे.

⊠ कोशावर स्फुट अभिप्राय, परीक्षणे आली, पण सविस्तर समालोचन आले नाही, हेच दुर्दैव.

ऑगस्ट १९९२), (५) 'संसारगाथा' (प्र. प्र. १२ फेब्रुवारी १९९४). (दळवींचें निधन १६ सप्टेंबर १९९४). कोशात पुढे 'निवडक मराठी नाटककार' या विभागात दळवींच्या वीस नाटकांची नोंद आहे; पण ही नोंद करताना त्या नाटकांची नावे ना वर्णानुक्रमे दिली, ना कालानुक्रमाने. वर्णानुक्रम किंवा कालानुक्रम हा नोंदीचा आवश्यक विशेष आहे. (या एकूण कोशातच ना कसली संशोधकीय शिस्त आहे.)

'सभ्य गृहस्थ हो!' (प्रथम-प्रयोग २१ ऑक्टोबर १९७३) या नाटकाची नवी रंगावृत्ती आणि त्या अनुषंगाने पुनर्लेखन मधुकर तोरडमलांनी केले आहे, पण त्याचा कोशात उल्लेखही नाही. (मी या नाटकाचा प्रयोग २१ सप्टेंबर १९९५ ला 'बालगंधर्व', पुणेला पाहिला- दळवींच्या निधनानंतर (दळवीचं निधन १६ सप्टेंबर १९९४).

नमुना म्हणून एका नोंदीची मर्यादित स्वरूपात निरीक्षा केली.

कोश कसा नसावा याचा हा 'नाट्यकोश' नमुना आहे. संपादकांना 'कोश' म्हणजे काय याची तरी कल्पना होती की नाही याचीच शंका यावी असे त्याचे एकंदर स्वरूप आहे. हा 'कोश' नाहीच; नाटकाशी संबंधित जे जसे मिळेल, त्याचे हा 'नाट्यकोश' एक गाठोडे आहे.

अगदी अलीकडे, गेल्याच वर्षी प्रकाशित झालेला एक महत्त्वाचा कोश म्हणजे रां. शं. नगरकरांचा 'संत सुभाषित कोश'. (प्रकाशन ऑगस्ट २०११.) संस्कृत साहित्य सुभाषितांनी समृद्ध आहे आणि त्यांचे अनेक कोश उपलब्ध आहेत; परंतु मराठीत अशी सुभाषिते नाहीत, सुभाषित कोश तर दूरच, असा सर्वसाधारण समज असतो. परंतु मराठीतही विपुल सुभाषितें आहेत, पण त्यांचे संकलित कोश नाहीत, असे नगरकरांचे रास्त प्रतिपादन आहे. संतसाहित्यात विपुल सुभाषितांची पखरण आहे; पण त्यांची वेचणी, निवड फारशी झाली नाही. सर्व संतांच्या साहित्यातील सुभाषितांचा शोध, निवड व संकलन हा मोठा व्याप आहे; म्हणून नगरकरांनी ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, रामदास व तुकाराम या संतपंचकाच्या साहित्यातली सुभाषिते निवडून हा 'संत सुभाषित कोश' सिद्ध केलेला आहे. या कोशात पाच हजारांहून जास्त सुभाषितांचे संकलन केले आहे. सुभाषिते ही भाषेला, साहित्याला, संस्कृतीला संपन्न करणारी अमृतवाणी आहे. वीस वर्षांच्या अथक, निरलस परिश्रमातून, संशोधनातून हा कोश सिद्ध झाला आहे. मराठीत अशा प्रकारचे हे काम नि:संशय पहिलेच आहे. या कोशाला, सदतीस पृष्ठांची अभ्यासपूर्ण प्रस्तावना आहे. नगरकरांनी हा 'संत सुभाषित कोश' सिद्ध करून भाविकांना, रसिकांना आणि सर्वसाधारणांनाही या अमृतवाहिनीत निमज्जन करण्याची सोय करून दिली आहे.

मराठी कोशपरंपरा पुढे नेणाऱ्या एका अभिनव बृहद्कोशाचे अगदी आजच्या घडीला मुंबईत काम चालू आहे आणि त्याचा पहिला खंड प्रकाशित झाला आहे आणि हे काम करीत आहेत सुरेश पांडुरंग वाघे. वाघे यांचा मुळात मराठी भाषा, साहित्य यांच्याशी दूरान्वयानेही संबंध नाही. वाघे हे रसायनशास्त्राचे अभ्यासक; पण कोण्या एका क्षणी मेघांत वीज लखलखली आणि तिनं वाघ्यांना घट्ट पकडून ठेवले. हा कोश आहे 'संकल्पना कोश'. हा कोश थोडाफार पर्यायशब्दकोशाजवळ जाणारा आहे, पण त्याचा व्याप व विस्तार पर्यायकोशापेक्षा खूपच अधिक आहे. अशा प्रकारचा कोश मराठीत तरी पहिलाच आहे; त्याचा स्वतंत्रच वर्ग करावा लागेल. "प्रस्तुत 'संकल्पना कोशां'त मानवी विचार-व्यापारातील संकल्पना संगृहीत केल्या असून त्या संकल्पनेशी समानार्थी शब्द प्रथम देऊन, तिच्याशी संबंधित नामे, विशेषणे, क्रियाविशेषणे व क्रियापदे हीसुद्धा दिली आहेत." (वाघे, प्रस्तावना, 'संकल्पनाकोश', खंड १, पृ. अकरा.) या कोशाचा आवाका फार मोठा आहे. या 'संकल्पनाकोशा'चे दहा विभाग पाडले असून ते पुढीलप्रमाणे : (१) धर्म, (२) काल, (३) विश्व, (४) प्राणी व वनस्पती, (५) मानवी शरीर, (६) कुटुंबसंस्था, (७) नागरिकजीवन, (८) गुणावगुण, (९) मन व स्वभाव, (१०) ललितकला. त्याचा पहिला खंड २५ ऑगस्ट २०१० ला प्रकाशित झाला आहे. यात धर्म, काल, विश्व, प्राणी व वनस्पती या चार संकल्पनांशी संलग्न शब्दविचार आला आहे. त्याची एकूण पृष्ठे ४०१ असून त्याचा आकार २५×१८ सें.मी. आहे. याचे एकूण पाच खंड होणार असून पुढच्याही खंडांचे काम वेगाने सुरू आहे आणि या वर्षाच्या

अनुक्रमणिका





नोव्हेंबरपर्यंत सर्व खंड प्रकाशित होतील असा वाघे व प्रकाशक ग्रंथाली यांना विश्वास आहे.[८अ] गेली वीस-बावीस वर्षं वाघे यांनी या कामाला वाहून घेतले आहे. मराठीमधील आणि बहुधा सर्व भारतीय भाषांमधील हा अपूर्व कोश ठरेल.[९]

मराठीमध्ये सामान्यतः कोशवाङ्मय बऱ्यापैकी समृद्ध आहे. कोशवाङ्मयाला मराठीत अर्वाचीन काळात (साधारणतः १८५० पासून) दीडशेहून अधिक वर्षांची परंपरा आहे. परंतु झाले आहे त्यापेक्षा कितीतरी अधिक काम व्हावयाला हवे आहे. जाताजाता, व्हावयास हवीत अशी एकदोन उदाहरणं देण्यासारखी आहेत. जसे, हयात अथवा मृत वास्तव व्यक्तींचे चरित्रकोश असतात, तसे ललित वाङ्मयातील व्यक्तींचेही चरित्रकोश करता येण्यासारखे आहेत. कदाचित् ते अधिक रंजक, उद्बोधक होतील. मानवी जीवनाचे, मनाचे नानाविध, सूक्ष्मातिसूक्ष्म मनोव्यापार त्यांतून समजू शकतील. हरिभाऊ आपट्यांच्या कादंबऱ्यांतील यमू, शंकरमामंजी (पण लक्षांत कोण घेतो!!!), भावानंद, शिवरामपंत ('मी', सावळ्या, नानासाहेब, त्यांची सहधर्मिणी ('उषःकाल'), रामराजा, मेहेरजान, रणमस्तखान ('वज्राघात') आणखी अशा अनेक व्यक्ती, प्रत्यक्षाहूनही त्या अधिक वेधक आणि भेदक असतील. अशा लेखकाने निर्माण केलेल्या व्यक्ती अनुभवताना जीवनाचे अधिक व्यापक, विशाल, गूढ-रम्य दर्शन होईल. कादंबऱ्यांचे संक्षिप्त कथानक, तिचा अगदी थोडक्यात परिचय करून देऊन, अशा कादंबऱ्यांचे सारभूत कोश करता येतील. आणखी कितीतरी. मैदान मोकळे आहे. करायला हवीत अशी, करण्यासारखी कितीतरी कामे आहेत; पण करणार कोण आणि केली तर त्यांचा डोळसपणाने उपयोग करणारे तरी किती भेटतील? कोशवाङ्मय हे अभ्यासाचे, संशोधनाचे पहिले साधन आहे. (मात्र अखेरचे नव्हे.) पण.....असे अभ्यासक, संशोधक आज आहेत?

---

८अ. हा लेख लिहून झाल्यावर आता हा पंचखंडी कोश प्रकाशनासाठी सिद्ध झाल आहे.

९. सुरेश वाघे यांचा 'संकल्पनाकोश' – जयवंत वसंत चुनेकर, 'रुची', मार्च २०११, पृ. १३-१५.

**संपादकीय टीप** : हा लेख 'उपयोजित मराठी' या केतकी मोडक, संतोष शेणई, सुजाता शेणई यांनी संपादित केलेल्या, 'पद्मगंधा प्रकाशन', पुणे यांनी प्रसिद्ध केलेल्या (ऑगस्ट २०१२) पुस्तकात आलेला आहे. तथापि, तो मुळासारखा प्रसिद्ध झाला नाही, म्हणून लेखकांनी 'नवभारता'कडे प्रसिद्धीसाठी पाठवला.

टीप : I. (१) संपादनात सर्व टीपा परिशिष्टें गाळली. माझी भूमिका अशी होती की, हा निबंध संशोधनपूर्वक समीक्षेचा नमुना व्हावा. (२) सु. रा. चु.च्या कोश-सूची साहित्याचे परिशिष्ट वगळले. तेथे सु. रा. चुनेकरांची जाहिरात करावी असा चुनेकरांचा दुरूनही हेतू नव्हता. II. माझ्या लेखनातील तीव्रता फार सौम्य केली; मला ती तीव्रता हवीच होती.

**परिशिष्ट : २**

**काही संदर्भ-साहित्य :-**

(१) माझे बारा वर्षांचे काम उर्फ ज्ञानकोश मंडळाचा इतिहास– श्रीधर व्यंकटेश केतकर; ज्ञानकोश मंडळ, पुणे; १९२७, पृ.४+१८८+१६८; आकार ८.४×५.४; दीड रुपाया.

(२) शोधविज्ञान कोश (साधन आणि संदर्भ ग्रंथ); पुणे विद्यार्थी गृह प्रकाशन, पुणे; १८ सप्टेंबर १९८५; पृ. तेवीस + ५४३; १५०रु.

(३) प्रदर्शनातील कोशांची सूची – चिं. द्रा. कोर्डे, नि. प. शेंड्ये; प्राच्यविद्या अभ्यास संस्था, ठाणे; २४ ऑक्टोबर १९८६; टंकलिखित; पृ. ३+४४+२+४.

(४) कोश व सूची वाङ्मय : स्वरूप आणि साधन – संपादक : सरोजिनी वैद्य व इतर; राज्य मराठी विकास संस्था, मुंबई; १ मे १९९७; पृ. आठ + ३७८; २०० रु.

(५) मराठी ज्ञानकोश आणि ज्ञानकोशरचनाशास्त्र – डॉ. सौ. शोभा बुचे, श्री मंगेश प्रकाशन, नागपूर; २००२; पृ. तेरा+२७७; १५० रु. (यात परिशिष्ट २ मध्ये 'मराठी ज्ञानकोशांची सूची', 'अन्य भारतीय भाषांतील ज्ञानकोशांची सूची'; संदर्भ ग्रंथसूची आदी माहिती आहे.)

(६) कोशवाङ्मय : विचार आणि व्यवहार – डॉ. सदाशिव देव; सुपर्ण प्रकाशन पुणे; मे २००२;











⊠ अर्वाचीन मराठीवाङ्मय सेवक


मराठीतील संदर्भ-वाङ्मय
(मराठीतील कोश व सूची-वाङ्मय)
(३) कोशसदृश वाङ्मय
"महाराष्ट्र-परिचय"
"महाराष्ट्र-जीवन"
सांवत्सरिक
(वार्षिके)
"महाराष्ट्र सांवत्सरिक"
"केसरी-प्रबोध"
"केसरी-सारसंग्रह"
Year-Books
गॅझेटियर्स
(दर्शनिका)
मराठीतील संदर्भ-वाङ्मय
(मराठीतील कोश व सूची-वाङ्मय)
(४) सूचिवाङ्मय
ग्रंथसूची
नियतकालिक-सूची
ग्रंथकार-सूची
• प्रकाशन-वार्षिक
• ग्रंथविक्रेत्यांच्या याद्या
• ग्रंथालयांच्या याद्या
• प्रकाशकांच्या याद्या
सुभाषित ग्रंथभांडार
• लेखसारसंग्रह
• प्रबंध सारसंग्रह
सूची
निर्देशसूची
संदर्भसूची
शब्दसूची,
पदसूची,
प्रथम-चरणसूची

पृ. एकतीस + ४४७; ३००रु.

(७)मराठी कोश व संदर्भसाधने यांची समग्र सूची (इ. स. १८००–२००३); डॉ. वसंत विष्णु कुलकर्णी, राज्य मराठी विकास संस्था, मुंबई; मार्च २००७; पृ.५० + १८०; २०० रु.

**परिशिष्ट : ३**

**सु. रा. चुनेकर यांचे कोश व सूची-वाङ्मयविषयक लेखन :**

१. 'मराठी नियतकालिकांची सूची', खंड १ – परीक्षण, 'महाराष्ट्र साहित्य पत्रिका', एप्रिल-सप्टेंबर १९६९.

२. कोशरचना व मराठी कोशवाङ्मय – मुंबई मराठी साहित्य संघाने घेतलेल्या मेळाव्यात वाचलेला निबंध, १२ मे १९७४.

३. कोशवाङ्मय व संदर्भवाङ्मय – 'अर्घ्य' (संगमनेर महाविद्यालय वार्षिक, १९७७).

४. कोशवाङ्मय – 'अर्वाचीन मराठी वाङ्मयाची सांस्कृतिक पार्श्वभूमी', चर्चासत्र, वसईचे महाविद्यालय, येथे वाचलेला निबंध, १३ ऑक्टोबर १९८०.

५. कोशरचना व मराठी कोशवाङ्मय – 'भाषा व साहित्य : संशोधन', खंड १, संपादक वसंत स. जोशी, पृ. ४४२-४६०, महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे, नोव्हेंबर १९८१.

६. सूचि : शास्त्र व उपयोग – 'संशोधन : स्वरूप आणि पद्धती', संपादक : सु. रा. चुनेकर, रंगनाथ पठारे, दिलीप धर्म, संगमनेर महाविद्यालय, संगमनेर, १९८३.

७. 'डॉ. माधवराव पटवर्धन : वाङ्मयसूची', प्रस्तावना, महाराष्ट्र साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई; १९८३.

८. 'अभिनव मराठी–मराठी शब्दकोश' – द. ह. अग्निहोत्री (परीक्षण), 'भाषा आणि जीवन', हिवाळा (जानेवारी), १९८७.

९. 'आनंद साधले साहित्यसूची' – उमा दादेगावकर, मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई ४००००४. प्रस्तावना, पृ. ११ ते ६८.

१०. कोशवाङ्मय – 'मराठी वाङ्मयाचा इतिहास', खंड ६, भाग २, संपादक : गो. म. कुलकर्णी, व. दि. कुलकर्णी, महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे; १९९१.

११. सूचींची सूची – सु. रा. चुनेकर, मराठी विभाग, मुंबई विद्यापीठ, मुंबई आणि प्रतिमा प्रकाशन, पुणे, १९९५, पृ. १३८; ९० रु.

१२. मराठी संदर्भसूचि – साहित्य : आजचं वास्तव आणि अ. का. प्रियाळकर यांचे सूचिकार्य (निबंधवाचन), मराठी संशोधन मंडळ, मुंबई व मराठी विभाग, मुंबई विद्यापीठ. प्रकाशन 'मराठी संशोधन पत्रिका', जानेवारी-फेब्रुवारी-मार्च १९९६.

१३. मराठी संदर्भ-सूचि-साहित्य : विहंगमावलोकन आणि भावी कार्याची दिशा (निबंधवाचन), गरवारे महाविद्यालय, पुणे, येथे चर्चासत्रात निबंधवाचन, १७-१८ जून १९९५.

१४. मराठींतील कोशवाङ्मय : वस्तुस्थिती आणि अपेक्षा (निबंधवाचन), श्री. ना. दा. ठाकरसी महिला विद्यापीठ, मुंबई, २८ सप्टेंबर १९९६.

१५. मराठीतील संदर्भसूची – 'कोश व सूचिवाङ्मय : स्वरूप आणि साध्य', संपादक : सरोजिनी वैद्य आणि इतर, राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ४००००१, १ मे १९९७.

१६. Reference Literature - A History of Modern Marathi Literature, Vol.2, Editor : Rajendra Barnhatti, G. N. Joglekar, Maharashtra Sahitya Parishad, Pune, p. 300-315. 14 January 2004. (इ. स. १८०० ते २००० या काळातील मराठी कोशवाङ्मय, मूळ मराठी लेखाचा इंग्रजी अनुवाद. अनुवादक : प्रा. शिरीष चिंधडे.)

१७. गोमंतकीयांचे मराठीतील कोशकार्य व सूचिकार्य, गोमंतकीय मराठी साहित्य-संशोधन विशेषांक, मैत्र, मार्च २००१.

१८. कोशवाङ्मय – 'मराठी विश्वकोश', खंड ४, पृ. ३७२ ते ३७४. संपादक : लक्ष्मणशास्त्री जोशी, महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ, मुंबई.

१९. शब्दकोश – 'मराठी विश्वकोश', खंड १७, संपादक : लक्ष्मणशास्त्री जोशी; महाराष्ट्र राज्य साहित्य-संस्कृती मंडळ, मुंबई; २००७, पृ. ५९९ ते ६०२.

अनुक्रमणिका








२०. विश्वकोश – 'मराठी विश्वकोश' खंड १६, संपादक : लक्ष्मणशास्त्री जोशी; महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ, मुंबई; १९९९. (सहकार्याने).

२१. श्री. व्यंकटेश माडगूळकर ग्रंथसूची – नागेश भी. कांबळे, (अभिप्राय. अप्रकाशित), ९ जुलै २००१.

२२. विश्वकोश – अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलन, 'अमृतसंचय' स्मरणिका, पुणे; १८ जानेवारी २००१.

२३. कोशवाङ्मय – समाविष्ट : 'उपयोजित मराठी', पद्मगंधा प्रकाशन, पुणे; १४ ऑगस्ट २०१२. माझ्या या मूळ लेखात संपादकांनी काही वगळले. मला विचारले नाही. माझ्या मूळ निबंधातील तीव्रता वगळली.

---

महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाच्या 'मराठी वाङ्मयकोशा'साठी, महाराष्ट्र साहित्य परिषदमार्फत डॉ. म. वि. गोखले यांच्याकडे ९ शब्दकोश, १६ ज्ञानकोश अशा एकूण २५ कोशांवर मी टिपणे लिहून दिली, नोव्हेंबर-डिसेंबर १९८७. (अप्रकाशित)

---



अनुक्रमणिका








# गांधीवाद आणि मराठी कादंबरीची समीक्षा

गोमटेश्वर पाटील

## • गांधीवादी दृष्टिकोनातून मराठी कादंबरीची समीक्षा :

समग्र मानवी जीवनाचे कल्याण, सत्य, अहिंसा आणि नैतिक मूल्यांचा आग्रह या तत्त्वांवर आधारित जगण्याची जी जीवनदृष्टी म. गांधींनी समाजाला दिली, तिला 'गांधीवाद' असे म्हटले जाते. गांधीवाद ही एक जीवनदृष्टी आहे. धार्मिक तत्त्वज्ञानावर आधारित पण आचारधर्माचे प्रत्यक्ष उपयोजन, समाजकारण, राजकारण, शिक्षण यांविषयी विशिष्ट जीवनविषयक दृष्टिकोन भारतीय समाजाला गांधीवादी विचारसरणीने दिला. यंत्राधिष्ठित समाजव्यवस्थेला विरोध, यंत्रांमुळे जर खेडी उद्ध्वस्त होत असतील तर त्यालाही विरोध, ग्रामीण खेड्यांचे शोषण व यंत्राधिष्ठित समाजव्यवस्थेतून होणाऱ्या पिळवणुकीला विरोध, यातून 'खेड्याकडे चला' हे तत्त्व, ईश्वरावर नितान्त श्रद्धा, अहिंसा आणि ब्रह्मचर्य हे सत्याकडे नेणारे मार्ग आहेत, ब्रह्मचर्य हा आचारधर्म आहे, ऐंद्रिय सुखाला विरोध करून सुखवादी विचारापेक्षा त्यागमय जीवनाकडे कल असे काहीसे गांधीवादी विचारसरणीचे दृष्टिकोन होते. 'अहिंसा' हे सत्याकडे नेणारे साधनमूल्य आहे आणि व्यापक अर्थाने ब्रह्मचर्य हा एक महत्त्वाचा आचारधर्म आहे. ईश्वरावर नितान्त श्रद्धा आणि निर्भयता या बाबी गांधीजींना अत्यंत महत्त्वाच्या वाटत. त्यांचा मूल्यव्यूह आत्मिकतावादी असल्यामुळे जडवादी मूल्यांना, विशेषतः ऐंद्रिय संवेदनांचे सुख अंतिम प्राप्तव्य मानणाऱ्या सुखवादी विचारांना, त्यांचा विरोध होता. चौर्यकर्म; आर्थिक, सामाजिक, धार्मिक-विशेषतः स्त्रियांबद्दल- अनुदार विचार; जात, वर्ण, संप्रदाय, धर्म, वंश, राष्ट्र या कल्पनांच्या आधारे निर्माण होणारी सहिष्णुता आणि एकूणच माणसाला हीन लेखणाऱ्या कोणत्याही गोष्टी गांधीजींना अमान्य होत्या. ही जीवनमूल्ये आधारभूत मानून व्यक्तीचे व्यक्तिगत आचरण, तसेच समाजकारण, राजकारण, व्यवसाय हवे, असा त्यांचा आग्रह होता. याच कारणामुळे त्यांचे स्वतःचे राजकारण हे धर्माधिष्ठित होते. त्यांची ही धार्मिक-नैतिक दृष्टी सर्व जीवनव्यवहाराच्या मुळाशी होती.'[१]

वरील दृष्टिकोनातील काही विचार गृहीत धरून मराठी साहित्यात साहित्यनिर्मिती आणि समीक्षेची निर्मिती झाल्याचे दिसते. १९२० ते १९४५ हे युग गांधीयुग म्हणून ओळखले जाते. १९२० नंतर विशेषतः या विचारप्रणालीचा उगम झाला आणि पुढच्या दशकातच समाज, विचारवंत व साहित्य यांवर गांधीवादी विचारसरणीची लाट प्रभाव पाडून गेली. गांधीयुगाचा तत्कालीन परिणाम त्या काळातील अनेक विचारवंतांवर झाला. आचार्य विनोबा भावे, दादा धर्माधिकारी, आचार्य जावडेकर, पु. य. देशपांडे, सानेगुरुजी असे अनेक मातब्बर विचारवंत गांधीवादी विचारसरणीने प्रेरित झाले. सामाजिक क्षेत्रात गांधीवादाचे वारे वाहू लागले. वैचारिक निबंधांतून आणि नियतकालिकांतून या विचारांची मांडणी होऊ लागली. सानेगुरुजींच्या बरोबर वामन मल्हार, वि. स. खांडेकर, पु. य. देशपांडे आदी साहित्यिकही प्रभावित झाले. गांधीवादी विचारसरणीचा पुरस्कार वैचारिकाबरोबर ललित वाङ्मयातही होऊ लागला.

सत्याचे आणि शिवाचे आकलन सौंदर्यातून (कलेतून) करून घेणे, मनाचे पावित्र्य हेच खरे सौंदर्य, या सौंदर्याचा आत्माविष्कार व्हावा, हीच साहित्याची भूमिका घेऊन मराठीत काही साहित्य निर्माण होऊ लागले. गांधीवादी साहित्याविषयी पुढील मत पाहिल्यास याचे स्वरूप लक्षात येईल. 'साहित्य हे आत्माविष्काराच्या स्वरूपाचे असते, हे त्यांना मान्य असले, तरीही साहित्याच्या मुळाशी असणारा त्यांना अभिप्रेत असलेला आत्मा हा अत्यंत पवित्र व वासनांचे उदात्तीकरण झालेला, अहंकाररहित झालेला, तपःपूत असा होता. गांधीजींना साहित्यात या स्वरूपाकडे जाणारी आत्मिक प्रवासाची धडपड दिसायला हवी होती. साहित्यातील गांधीवादाचा

प्रभाव जोखताना हा निकष महत्त्वाचा ठरावा. याबरोबरीनेच त्यांना साहित्यकृतीतील भाषाही साधी सरळ, थेट, हृदयाला भिडणारी प्रभावी असावी, असे वाटत होते. भावनात्मक सचोटी, लेखकाचे व्यक्तिमत्त्व हे स्वातंत्र्य, निर्भयता, करुणा, त्याग, सेवा, अन्यायविरोधासाठी आत्मक्लेश, आत्मबलिदान या प्रकारच्या जीवनमूल्यांनी प्रभावित असेल आणि वर सांगितलेल्या जीवनदृष्टीचा लेखकाने स्वीकार केला असेल, तर त्याच्या व्यक्तिमत्त्वातून सहजपणे व अपरिहार्यपणे गांधीवादाने भारलेले साहित्य निर्माण होईल.'[२]

वरील विवेचनातील साहित्यविषयक दृष्टी लक्षात घेऊन मराठी साहित्यात काही महत्त्वाच्या मातब्बर साहित्यिक कलावंतांनी आपली कलाकृती मांडण्याचा प्रयत्न केला आहे. कलाकृतीच्या मांडणीबरोबर आपले याबाबतचे वैचारिकही महाराष्ट्रात निर्माण होऊ लागले. या वैचारिकतेतूनच गांधीवादी समीक्षेचा दृष्टिकोन उदयास आला. हा दृष्टिकोन समोर ठेवून काही समीक्षकांनी कादंबरीविषयी अगदी त्रोटक प्रमाणात गांधीवादी समीक्षा मांडली.

यामध्ये नियतकालिकांतील काही स्फुटसमीक्षणे, कादंबरीचा इतिहास लिहिताना केलेली समीक्षा, काही समीक्षाग्रंथांत समाविष्ट झालेली समीक्षा इ. कादंबरीविषयी समीक्षा मराठी समीक्षेत पहावयास मिळते. वा. ल. कुलकर्णी, अ. ना. देशपांडे, चंद्रकांत बांदिवडेकर, प्रा. गो. म. कुलकर्णी इ. समीक्षकांनी गांधीवादाच्या अनुषंगाने कादंबरीविषयी समीक्षा मांडलेली दिसते.

**• वा. ल. कुलकर्णी**

कादंबरीविषयी *सत्यकथत* १९६० चा वा. ल. कुलकर्णी यांचा प्रस्तावनावजा लेख 'गांधीवादाचा मराठी वाङ्मयावरील परिणाम' या नावाने प्रसिद्ध आहे.

प्रस्तावनेमध्ये 'आधी केले मग सांगितले', असा गांधीवाद हा योग प्रत्यक्ष जीवनयोग आहे. तो अभ्यासण्या-साठी नसून आचरण्यासाठी आहे, असे सांगून १९२० ते १९४५ या काळात गांधीवादाचा प्रभाव असणारी कविता, नाटक आणि कादंबरी यांचा आढावा वा. ल. कुलकर्णींनी घेतला आहे. कादंबरीने गांधीवादी मनाचे कितपत यथार्थ दर्शन घडविले, गांधीजींच्या अस्पृश्योद्धाराच्या, ग्रामोद्धाराच्या, खादीच्या, अहिंसेच्या, सत्याग्रहाच्या राष्ट्रव्यापी चळवळींनी ती कितपत थरारली गेली, ह्या चळवळींची प्रत्ययकारी चित्रे रेखाटण्याचे तिला कितपत सुचले व जमले, असे काही मूलभूत प्रश्न निर्माण करून गांधीवादाचे उच्च आणि आदर्श तत्त्व सानेगुरुजींच्या साहित्यात येते, असे वालंचे मत आहे. सानेगुरुजींच्या साहित्याने गांधीवादाचे संस्कार संस्कारसुलभ बालवयातील वाचकांवर फार मोठ्या प्रमाणात केले. सानेगुरुजींच्या साहित्यानंतर *कांचनमृग* ते *ययाती*पर्यंत खांडेकरांच्या साहित्यावर गांधीवादी विचारांचा प्रभाव असून गांधीवादातील त्याग, पराक्रम, ध्येयनिष्ठा, मानवता इ. तत्त्वे देशभक्त, वीरांगना, समाजसेविका, सत्याग्रही इ. व्यक्तिमत्त्वांच्या अनुषंगाने खांडेकरांनी रंग भरले आहेत, असे वा. ल. म्हणतात.

खांडेकरांच्या बरोबरीने वामन मल्हारांच्या *इंदू काळे सरला भोळे* या कादंबरीतील विनायकरावांवर गांधीवादाचा परिणाम आहे. १९२० ते १९४२ पर्यंत मराठी साहित्यावर या ना त्या प्रकारे गांधीवादाचा प्रभाव आहे, असे वा. लं. ना वाटते. अगदी प्रकृतीधर्माने भिन्न असणाऱ्या पु. य. देशपांडे, माडखोलकर, वरेरकर यांच्या कादंबऱ्यांतील ध्येयवादी पात्रे ही गांधीवादी विचारांची चित्रे आहेत. सानेगुरुजी, खांडेकर, वामन मल्हारांसह या काळावरच गांधीवादी विचाराचा पगडा होता, असे त्यांचे म्हणणे दिसते. प्रस्तावनावजा या समीक्षेत गांधीवादी विचार-सरणीच्या कादंबऱ्यांचा आढावा वा. ल. कुलकर्णी यांनी घेतला आहे.

**• अ. ना. देशपांडे**

*सत्यकथ*च्या याच लेखात 'गांधीवादाचा मराठी कादंबरीवाङ्मयावर झालेला परिणाम' या विषयात अ. ना. देशपांडे यांनी काही विचार मांडले आहेत. कोणतीही प्रभावी विचारधारा प्रचलित वाङ्मयावर आपला प्रभाव बसविते. विशिष्ट सामाजिक प्रश्नाचे दिग्दर्शन करणारे वाङ्मय आणि सामाजिकतेच्या संस्कारापासून सर्वस्वी अलिप्त आहे असे वाटणारे व केवळ शुद्ध सौंदर्याचा साक्षात्कार घडविणारे वाङ्मय असे वाङ्मयाचे दोन भेद अ. ना. देशपांडे यांनी केले असून, यांपैकी दुसरा वृथा असून 'सौंदर्य निर्माण करणाऱ्या प्रतिभावंताच्या

अनुक्रमणिका

व्यक्तिमत्त्वाच्या घडणीत, त्यांच्या बनावात सामाजिक शक्तींचा प्रभाव निश्चित कार्यक्षम झालेला दिसतो. यावरून साहित्याचा आणि सामाजिक विचारप्रणालींचा अन्योन्य-संबंध लक्षात येतो. वाङ्मयाच्या आशयाचा पिंड समकालीन विचारधनावर पोसलेला आहे.' [३] हे अ. ना. देशपांडे यांचे मत येथे लक्षात घेण्यासारखे आहे. संपूर्ण जगात गांधीजींच्या व्यक्तिमत्त्वाची छाप पडली असून १९२० नंतर भारतीय जीवनात गांधींच्या व्यक्तिमत्त्वाची छाप नाही, असे एकही क्षेत्र उरलेले नाही. १९२० नंतर गांधीवाद, हिंदुत्ववाद व साम्यवाद या तीन प्रमुख विचारधारांचा प्रभाव मराठी साहित्यावर आहे, असे देशपांडे यांचे मत असून, गांधीवादासंबंधी अ. ना. देशपांडे यांनी मराठी कादंबरीक्षेत्रात चार प्रतिक्रियांचा उहापोह केला आहे. यांपैकी पहिली प्रतिक्रिया विरोधाची, दुसरी उदासीनतेची, तिसरी डोळस सहानुभूतीची आणि चौथी प्रतिक्रिया निरपवाद निष्ठेची, संपूर्ण शरणागतीची.

गांधीवादाच्या विरोधाची पार्श्वभूमी माडखोलकरांच्या कादंबऱ्यांत येते. हा विरोध माडखोलकरांच्या पात्रांनी केला असून गांधीवादावरचे ठरावीक आक्षेप माडखोल-करांच्या पात्रांनी आळविले आहेत. गांधीवाद क्रांतीला मारक आहे, गांधीविचार दांभिक आहे इ. आक्षेप माडखोलकरांनी आपल्या पात्रांद्वारे केले आहेत, असे अ. ना. देशपांडे म्हणतात.

एकूणच जीवनदर्शन आणि जीवनदृष्टीबद्दल अनास्था दाखवणारे ना. सी. फडके यांची गांधीवादावरची प्रतिक्रिया उदासीनतेची आहे. फडक्यांच्या कादंबरीतही इतर वादांबरोबर गांधीवाद आला आहे; पण तो प्रेमप्रकरणाचे एक साधन म्हणून आला आहे. फडके एखाद्या विचारसरणीचा, एखाद्या आंदोलनाचा प्रेमाच्या सफलतेसाठी वापर करतात. ( कॉम्रेड डांगे यांच्या मोर्चाचे उदाहरण फडक्यांच्या कादंबरीत कसे आले आहे, हे सर्वश्रुत आहेच.) फडक्यांच्या दृष्टीने विचारसरणीपेक्षा प्रेम महत्त्वाचे आहे, म्हणून फडक्यांची गांधीवादाबद्दलची उदासीनता अ. ना. देशपांडे यांनी दाखवून दिली आहे.

गांधीवादाबद्दलची सहानुभूती बाळगणारे लेखक म्हणून खांडेकर आणि प्रेमा कंटक या दोन कादंबरीकरांचा अ. ना. देशपांडे उल्लेख करतात. गांधीवादाबद्दल पूर्ण आदर बाळगून कलात्मक व यथार्थ दर्शन घडविण्याचे काम या लेखकांनी केले आहे. गांधीवादाबद्दलची चौथी प्रतिक्रिया म्हणून निष्ठेची व संपूर्ण शरणागतीची प्रतिक्रिया देशपांडे मांडतात. या प्रतिक्रियेमध्ये एकमेव कादंबरीकार म्हणून देशपांडे यांनी सानेगुरुजींना स्थान दिले आहे.

मराठीतील गांधीवादाच्या प्रतिक्रिया देणारे लेखक म्हणून या चार लेखकांचे उदाहरण देऊन गांधीवादाचा मराठी वाङ्मयावरील परिणाम (प्रतिक्रिया) अ. ना. देशपांडे यांनी दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. त्यांच्या मते, या कालखंडात सुमारे साठ कादंबरीकार या विचारप्रणालींच्या प्रभावाने लेखन करत होते. यामध्ये वरील कादंबरीकारांखेरीज- वा. म. जोशी, भा. वि. वरेरकर, पु. ल. देशपांडे, हडप, बोकिल, शिरवाडकर, शिखरे, दांडेकर, पेंडसे इ. कादंबरीकारांचा उल्लेख देशपांडे यांनी केला आहे. पण मराठी कादंबरीक्षेत्रात निष्ठावंत गांधीवाद्याला समाधान लाभण्यासारखी कादंबरी नाही. 'एखाद्या संभाव्य कथानकाच्या माध्यमातून जीत गांधीवादी जीवनरीतीचे मोठे सरससुंदर, यथार्थ आणि प्रभावी दर्शन घडविले आहे, अशी एकही कादंबरी नाही, ही वस्तुस्थिती आहे.' [४] असे मत व्यक्त करून याचे कारण सांगताना मराठी मनाची गांधीवादाबद्दलची उदासीन अलिप्त वृत्ती व मराठी साहित्यावर अगदीच बेताचा गांधीवादाचा प्रभाव हा आहे, असे त्यांना वाटते.

## • चंद्रकांत बांदिवडेकर

वा. ल. कुलकर्णी आणि अ. ना. देशपांडे यांच्या वरील विवेचनाचा संदर्भ देऊन या लेखात (पुढे हा लेख *मराठी कादंबरी-चिंतन आणि समीक्षा* या ग्रंथात समाविष्ट आहे.) चंद्रकांत बांदिवडेकरांनी 'गांधीवाद आणि मराठी कादंबरी' या विषयावर विवेचन केले आहे. गांधीवादाचा प्रभाव वैचारिक व राजकीय क्षेत्राप्रमाणेच मराठी साहित्यावरही पडला असून त्यातही कादंबरी या वाङ्मयप्रकारावर तो विशेष प्रकर्षाने जाणवतो. गांधीवादाचा प्रभाव मराठी साहित्यात कोणकोणत्या साहित्यिकांवर कसा पडला आहे, याचे विवेचन करताना कादंबरीतील पात्रे, त्या पात्रांचे वर्तन, त्या पात्रांचा दृष्टिकोन व लेखकाने त्यांच्याविषयी मांडलेला दृष्टिकोन या गोष्टींचा








विचार बांदिवडेकरांनी या लेखात केला आहे.

गांधीवादाचा बराच मोठा वैचारिक प्रभाव असणारे लेखक म्हणून बांदिवडेकरांनी वामन मल्हारांच्या कादंबऱ्यांचे मूल्यमापन केले आहे. वामन मल्हार हे शुद्ध साहित्याचे समर्थक असूनही सामाजिक आशयाचे वावडे बाळगणारे नव्हते. त्यामूळे वामन मल्हारांच्या कादंबऱ्यांत गांधीवादी विचाराचे अनुभव कसे येतात आणि त्यांची पात्रे गांधीवादी कशी ठरतात, याचे विवेचन केले आहे. *इंदू काळे सरला भोळे* या कादंबरीतील विनायकरावांचे वर्तन त्यांना गांधीवादी वाटते. पण त्यात वामन मल्हार पूर्णतः गांधीवादी विचाराने पाहत नाहीत; कारण त्यांना समाजवाद व गांधीवाद या दोन्ही मार्गांची अव्यवहार्यता किंवा अपूर्णता जाणवली असेल, अशी शंका बांदिवडेकर यांनी व्यक्त केली आहे.

वामन मल्हारांनंतर वरेरकरांच्या कादंबऱ्यांतील पात्रांच्या वर्तनातून कादंबरीत येणाऱ्या खादीप्रचार, सूतकताई, श्रमदान, सफाई इ. घटनांचे आधार घेऊन त्यांच्या कादंबऱ्यांतील गांधीवाद बांदिवडेकर दाखवितात. पण येथे वरेरकरांच्या नाटकांप्रमाणे गांधीवादी तत्त्वज्ञानातून येणारी तल्लीनता कुठेही आढळत नाही. त्यामुळे वरेरकरांनी तत्कालीन गांधीवादी कार्यकर्त्यांवर मिस्कीलपणे भाष्य केले आहे, असे बांदिवडेकर म्हणतात.

गांधीवादाचा अधिक जाणीवपूर्वक प्रभाव घेऊन आलेले तिसरे व मोठे लेखक म्हणून वा. ल. कुलकर्णी यांच्या संदर्भाचा आधार घेऊन बांदिवडेकरांनी खांडेकरांचे नाव घेतले आहे. अर्थप्रधान संस्कृतीचे चित्रण, सामाजिक विषमतेचे चित्रण, समाजवाद व गांधीवाद या सर्वांचा विचार खांडेकरांच्या कादंबऱ्यांमध्ये येताना दिसतो. गांधींबद्दलचा व्यक्तिगत आदर खांडेकरांच्या कादंबऱ्यांमध्ये दिसतो, असे मत ते व्यक्त करतात.

त्यांच्या मते साहित्यक्षेत्रात दुय्यम असणारे कादंबरीकार प्रेमा कंटक आणि सानेगुरुजी यांच्या कादंबऱ्यांत मात्र गांधीवाद निष्ठेने आला आहे. पण महाराष्ट्राच्या वैचारिक परंपरांच्या पार्श्वभूमीवर या लेखकांच्या कादंबऱ्यासुद्धा विशुद्ध गांधीवादी राहत नाहीत सानेगरुजींच्या बहुतेक कादंबऱ्यांचा उल्लेख करून त्यांमधील पात्रे व त्यांची श्रद्धा गांधीवादावर होती, असे बांदिवडेकर म्हणतात. परंतु *संध्या* सारख्या कादंबरीत सानेगुरुजींनी 'गांधीवाद' आणि 'मार्क्सवाद' यांबद्दल विचारमंथन दाखविले आहे. सानेगुरुजींची एकमेव *श्यामची आइ* ही सर्वार्थाने गांधीवादी आहे, असे बांदिवडेकरांना वाटते.

गांधीवादाचे समर्थन करणाऱ्या लेखकांबरोबर गांधीवादाला विरोध करणाऱ्या लेखकांचा विचारही येथे केला आहे. यामध्ये फडक्यांच्या कादंबरीतील गांधीचळवळीची आणि राजकारणाची अव्यवहार्यता, गांधीवाद हा हृदयपरिवर्तनाचा अशक्य कोटीतला मार्ग, काँग्रेसच्या नीतीची सूत्रे भांडवलदारांच्या हाती कशी आहेत, अशा गोष्टींकडे बोट दाखवत गांधीवादातील काही त्रुटी फडके यांनी दाखविण्याचा प्रयत्न केला आहे, असे बांदिवडेकरांना वाटते.

आपल्या कादंबऱ्यांतून गांधीवादाला आणि व्यक्तिशः गांधींना विरोधाची माडखोलकरांच्या दृष्टीची नोंदही बांदिवडेकरांनी घेतली आहे.

एकूण मराठी कादंबरीचा विचार करताना बांदिवडेकरांनी गांधीवादाच्या मराठी कादंबरीतील अपयशाची चर्चा केली आहे. यामध्ये त्यांची विधाने सारांशवजा लक्षात घेणे महत्त्वाचे आहे.

१) मराठी कादंबरीवर पडलेल्या गांधीवादाच्या प्रभावाचा विचार करता मराठी लेखकांनी गांधीवादाकडे नेहमीच शंकेच्या, संशयाच्या किंवा असमाधानाच्या दृष्टीने पाहिले आहे.

२) स्वातंत्र्यानंतर गांधीवादाच्या सर्व कल्पना हवेत विरून गेल्यामुळे गांधीवादाचा प्रभाव स्वातंत्र्योत्तर काळात पडू शकला नाही.

३) गांधीवादाचा प्रभाव वरपांगीच राहिला याचे खरे आणि मुख्य कारण या काळातील कृतक रोमँटिक साहित्यप्रवृत्तीत आहे. खांडेकरांच्या कादंबऱ्यांचे नायक होण्याचे भाग्य कधी हरिजनाला, तर कधी कुणब्याला मिळाले; पण त्यांच्या मनाचा खरा पीळ, त्यांची दुःखे, दुखावलेली अस्मिता, त्यांचे न्यूनगंड, सामाजिक ससेहोलपट, मानसिक कुचंबणा यांचा चुकूनही उल्लेख कधी आला नाही.

४) गांधीवाद न मानवण्याचे खरे कारण, मराठी

कादंबरीकारांची सुखवादी प्रवृत्ती. फडके या प्रवृत्तीचे उघड समर्थक बनले गेले असले तरी खांडेकर, वरेरकर व वा. म. जोशीही कमी-अधिक प्रमाणात या प्रवृत्तीला शरण गेलेले दिसतात; अन्यथा खेड्यात जाऊनही तिथल्या परिस्थितीचा वस्तुनिष्ठपणे वेध घेण्याऐवजी प्रेम-त्रिकोणाचा चाळा करीत हे लेखक बसले नसते.

शेवटी 'गांधींच्या वीरवृत्तीचा जरी प्रभाव पडला असता, तरी मराठी कादंबरी उंचावली असती,' अशी शक्यता वर्तवून मराठी कादंबरीतील गांधीवादाच्या अपयशाची चर्चा केलेली दिसते.

● **गा. म. कुलकर्णी**

बांदिवडेकरांच्या नंतर गांधीवादी विचारसरणी गृहीत धरून प्रा. गो. म. कुलकर्णी यांनी *साद-पडसाद, गांधीवाद आणि आधुनिक मराठी साहित्य* या ग्रंथामध्ये एकूण मराठी साहित्य व गांधीवाद या दृष्टीने कादंबरीविषयी काही मते मांडली आहेत.

गांधीयुगामध्ये मराठी कादंबरीला नाटक वा इतर वाङ्मयप्रकारांपेक्षा भरती आली होती. फडके, खांडेकर, माडखोलकर, सानेगुरुजी, पु. य. देशपांडे हे सर्व प्रथितयश गांधीयुगातलेच होते. या साऱ्यांच्या कादंबऱ्यांत चळवळीचे चित्रण येते. पण गो. म. कुलकर्णी यांच्या मते यांपैकी एकाही लेखकाने चळवळीच्या मर्माला स्पर्श केल्याचे दिसत नाही. त्यामुळे 'मराठी साहित्यातील गांधीवादी विचार किती वरवरचा आहे; हे यावरून स्पष्ट व्हावे'[५] हे गो. मं. चे विधान महत्त्वाचे आहे.

द. दि. पुंडे यांनी संपादित केलेल्या गांधीवाद आणि आधुनिक मराठी साहित्य या ग्रंथामध्ये गो. म. कुलकर्णी यांनी ललितसाहित्याचा विचार करताना मराठी कादंबरी आणि गांधीवाद यांचा विचार केला आहे. मानवी जीवनव्यवहारातील विचारक्षेत्रांचा कमी-अधिक प्रमाणात साहित्यावर परिणाम होत असतो, यानुसार गांधीवाद या विचारप्रणालीचा मराठी साहित्यावर जो परिणाम झाला, त्याचा व त्यांच्यातील परस्परसंबंधाचा अन्वय लक्षात घेऊन गो. म. कुलकर्णी यांनी मराठी साहित्य व गांधीवादाचा विचार प्रस्तुत बीजभाषणात मांडला आहे.

त्यांच्या मते, गांधीवाद हा पारंपरिक भारतीय आध्यात्मिक धारणा व त्यात काही पाश्चात्त्य तत्त्वकल्पनांचे मिश्रण असलेला आधुनिक 'गतिमार्ग' आहे. गांधीवादाचे विचारधन हे स्वानुभवसिद्ध आहे. अशा या गांधीवादाचा मराठी साहित्यावर प्रत्यक्ष-अप्रत्यक्ष प्रभाव जाणवल्या-शिवाय राहत नाही, असे ते म्हणतात. मराठी नाटक, कादंबरी, मराठीतले गद्य व भावकविता यांवर गांधीवादाच्या परिणामाची चर्चाही येथे गो. म. कुलकर्णींनी केली आहे. मराठी नाट्याचा विचार करताना, गांधीवादाचा स्पर्श असणारी नाट्यकृती मराठीत निर्माण झाली नाही; ज्या निर्माण झाल्या त्या फारच उथळ स्वरूपाच्या झाल्या, असे ते म्हणतात.

हाच प्रकार मराठी कादंबरीविषयी झाला, असे गो. म. कुलकर्णी यांचे मत आहे. या काळातील काही महत्त्वाच्या कादंबरीकारांचा उल्लेख करून यांमध्ये वा. म. जोशी, केतकर, फडके, खांडेकर, माडखोलकर, पु. य. देशपांडे, मामा वरेरकर या गांधीयुगात उदयास आलेल्या कादंबरीकारांच्या कादंबऱ्यांचा आणि गांधीवादाचा अन्वय लावण्याचा प्रयत्न त्यांनी केला आहे. बांदिवडेकरांनी केलेल्या मूल्यमापनाप्रमाणेच कादंबरीतील पात्रांचे वर्तन व कादंबरीकाराने गांधीवादाच्या अनुषंगाने भरलेले रंग-प्रसंग यांची चर्चा करून एकूणच मराठी कादंबरी गांधीवादाशी परिपूर्ण व समरस होऊन तादात्म्य पावू शकली नाही, या निष्कर्षाप्रत गो. म. कुलकर्णी आले आहेत.

वामन मल्हारांच्या *इंदू काळे सरला भोळे* या कादंबरीतील विनायकराव गांधीवादी वृत्तीचा असला, तरी तो गांधीवादाशी पूर्णतः तादात्म्य पावल्याचे दिसत नाही. वामन मल्हारांच्या अनेक कादंबऱ्यांमध्ये गांधीवादाशी जवळीक साधण्याची वृत्ती दिसते.'वा. मं. च्या जीवनधारेणेचे कितीतरी पैलू गांधीवादाशी जवळीक साधणारे आहेत. तत्कालीन अनेक महाराष्ट्रीय सुशिक्षितांपेक्षा वामन मल्हारांची गांधीजींकडे पाहण्याची दृष्टी अधिक निर्मळ होती.' असे असूनही वामन मल्हार गांधीवादापासून दूरच राहिले.'[६]

त्या काळातील एकूणच विचारप्रणाली व प्रवृत्ती यांपासून दूर राहिलेले केतकर केवळ उपयुक्ततावादी व समाजशास्त्रीय दृष्टीशी अनुबंधित राहिल्यामुळे तेही गांधीवादापासून दूर राहिले.

मराठी कादंबरी गांधीवादाशी अधिकाधिक तादात्म्य पावू शकली नाही. फडके, खांडेकर, माडखोलकर, पु. य. देशपांडे यांच्याही बाबतीत ते म्हणतात, 'फडके, खांडेकर, माडखोलकर, पु. य. देशपांडे ही मंडळी गांधीवादाच्या पर्यावरणातच उदयास आलेली; यामुळे गांधीवादाशी या ना त्या प्रकारे ती संबंधित राहिली. प्रसंगोपात्त त्यांच्या कादंबऱ्यांतून गांधीयुगीन राजकीय तत्त्वप्रणालीचे साद-पडसाद पुन्हा पुन्हा उमटताना आढळतातही. पण त्यांची एकंदर पातळी वृत्तपत्रीय चर्चेच्या पलीकडे जात नाही आणि त्यातही कळत नकळत गांधीवादाच्या विपर्यासालाच अग्रस्थान प्राप्त होते.'[७] (उदा : माडखोलकरांची *मुखवटे*) फडक्यांच्या कादंबरीत गांधीवादी राजकारणाचे प्रतिध्वनी आढळतात. खांडेकरांच्या कादंबरीत गांधीवादाचे रूपकात्मक पडसाद दिसतात, प्रेमा कंटक सच्चेपणाने आपल्या कादंबरीत गांधीवादाला सामोऱ्या जातात, पु. य. देशपांडे गांधीवादाशी समरस होताना व्यक्तिवाद व समाजवाद यांच्या तत्कालीन द्वंद्वात अडकतात व इतर कादंबरीकार गांधींच्या ग्रामजीवनाच्या संकल्पनेचा केवळ रुचिपालट म्हणून उपयोग करतात इ. निष्कर्ष गो. म. कुलकर्णींच्या गांधीवादाच्या चर्चेतून आपणास सारांशवजा लक्षात येतात.

गांधीवादाचा प्रभाव असणारे आणखी एक कवी-कादंबरीकार म्हणून वि. वा. शिरवाडकरांच्या *कल्पनेच्या तीरावर* या कादंबरीविषयी गो. म. कुलकर्णींनी चर्चा केली आहे. भविष्यकालीन कल्पनाचित्र (युटोपिया) या पद्धतीने लिहिलेल्या या कादंबरीतही गांधीवादाशी मनःपूर्वक जवळीक साधण्याचा प्रयत्न केल्याचे दिसत नाही, असे त्यांचे म्हणणे आहे. तसेच गांधीवादी दिशेने मनःपूर्वक वाटचाल करणारा कादंबरीकार म्हणून सानेगुरुजी यांचा प्रयत्न त्यांना महत्त्वाचा वाटतो. 'परंतु गांधीवादाचा एकंदर आवाका समर्थपणे पेलून धरण्यास लागणारे प्रतिभाबळ सानेगुरुजींजवळ नसल्यामुळे मध्यवर्ती साहित्यधारणेवर सानेगुरुजींचा प्रभाव पडू शकला नाही. या धारेने त्यांची उपेक्षाच केली.'[८]

एकूणच गांधीवादाचा प्रभाव मराठी साहित्यावर कितपत आहे, याचे उत्तर शोधताना गो. म. कुलकर्णी यांच्या मते, तो फारसा प्रभावी नाही. मराठीतील बहुतेक कादंबरीकारांना गांधीवादाचे उपयोजन आपल्या कादंबऱ्यांत संपूर्ण तादात्म्याने करता आले नाही. जे काही झाले ते फारच उथळ स्वरूपाचे अथवा गांधीवादाचा विपर्यास करण्यात झाले, असे एकूण त्यांच्या विवेचनातून दिसते.

गो. म. कुलकर्णी यांच्या या निबंधातील आणखी एक महत्त्वाचा भाग असा, की ते गांधीवादाचा अन्वय येथे अस्तित्ववादाशी लावण्याचा प्रयत्न करतात. याचे कारण सांगताना म्हणतात, 'या दोन्ही वादांना समान असलेली आत्मशोधाची व जीवनार्थशोधाची तीव्र तळमळ, या शोधाच्या दिशा भिन्न असल्या तरी आज ना उद्या या दोहोंचा समन्वयाचा संबंध प्रस्थापित होण्याची शक्यता आहे.'[९] त्या काळात वर्तवलेली ही शक्यता आजतरी खरी ठरल्याचे मराठी साहित्यात कोठे दिसत नाही. १९२० ते ४७ या कालखंडाला गांधीयुग म्हटले गेले खरे; परंतु विचारवंत व प्रतिभावंत यांच्या द्वंद्वात गांधीवादाचे खरे स्वरूप साहित्यात मांडले गेले नाही. गांधीवादाचा राजकीय प्रभाव तत्कालीन समाजावर जेवढा प्रभावी होता, त्या प्रमाणात गांधीयुगाचा प्रभाव साहित्यावर मात्र दिसत नाही, असेच बहुतेक समीक्षकांनी आपल्या विवेचनात स्पष्ट करण्याचा प्रयत्न केला आहे.

गो. म. कुलकर्णी यांच्या प्रस्तुत विवेचनानंतर मराठी कादंबरीसमीक्षेत गांधीवादाची नोंद १९६९ ऑगस्टच्या *युगवाणी* या नियतकालिकात सुरेश डोळके यांनी घेतली आहे. 'गांधीवाद आणि मराठी कादंबरी' या नावाने हा लेख प्रकाशित झाला.

**● सारांश**

गांधीवाद या विचारप्रणालीच्या अनुषंगाने झालेली कादंबरीची उपयोजित समीक्षा आढळते. यामध्ये गांधीवाद या सामाजिक विचारप्रणालीचा उहापोह करून या विचारप्रणालींच्या आधारे झालेली कादंबरीसमीक्षा तपासण्याचा प्रयत्न केला आहे. यामध्ये गांधीवादाचे तत्त्व-विवेचन व स्वरूप लक्षात घेऊन वा. ल. कुलकर्णी, चंद्रकांत बांदिवडेकर, द. दि. पुंडे, गो. म. कुलकर्णी इ. समीक्षकांनी गांधीवादी विचारप्रणाली लक्षात घेऊन मराठी कादंबरीची केलेली समीक्षा लक्षात घेतली आहे. गांधीवाद ही २० व्या शतकातील एक महत्त्वाची विचारप्रणाली आहे. १९२० ते १९४७ हा गांधी[illegible]चा काळ

होता. या काळातील साहित्यावर समकालीन प्रभावी विचारप्रणालीचा परिणाम होणे साहजिकच होते. या प्रणालीतून निर्माण झालेल्या साहित्याला गांधीवादी साहित्य म्हटले गेले. बहुतेक समीक्षकांनी गांधीविचाराचा प्रभाव असणारी कादंबरी वामन मल्हारांपासून गृहीत धरली आहे व सानेगुरुजी वगळता गांधीवाद बहुतेक कादंबरी-कारांमध्ये रुजला नसल्याचा अभिप्राय दिला आहे. गांधीवादी विचारवंत व गांधीवादी प्रतिभावंत या दोहोंच्या साहित्यात प्रबळ गांधीवाद आला नसल्याचे समीक्षकांचे म्हणणे आहे. केवळ पात्रांचे वर्तन, सूतकताई, सत्याग्रह म्हणजे गांधीवाद नव्हे, असा अभिप्रायही अनेकांनी दिला आहे. गांधींच्या व्यक्तिमत्त्वाने प्रभावित होऊन लिहिणारे साहित्यिक होते त्याचप्रमाणे त्यांच्या विचाराला विरोध करणारे कादंबरीकार या काळात झाल्याचेही बहुतेक समीक्षकांनी नोंदवले आहे. वामन मल्हारांच्या कादंबरीत गांधीवादाची तत्त्वचर्चा, पु. य. देशपांडे यांच्या कादंबरीत राजकीय पार्श्वभूमी, खांडेकरांच्या कादंबरीत गांधींबद्दलचा अत्यादर, फडके आणि माडखोलकरांच्या कादंबरीत गांधीवादाला विरोध आणि गांधीविचाराची अव्यवहार्यता, प्रेमा कंटक व सानेगुरुजींच्या कादंबरीत आलेला खरोखरीचा गांधीवाद व वि. वा. शिरवाडकरांच्या कादंबरीत आलेली कल्पनात्मकता असे गांधीवादाचे विविध रंग समीक्षकांनी अधोरेखित केल्याचे दिसते.

**संदर्भ**


१. मराठी वाङ्मयकोश– खंड चौथा, पृ. १०५.
२. तत्रैव, पृ. १०५.
३. अ. ना. देशपांडे, *सत्यकथा*, सप्टेंबर १९६०, पृ. १५.
४. तत्रैव, पृ. १७.
५. गो. म. कुलकर्णी, *साद पडसाद*, मुंबई, पॉप्युलर प्रकाशन- १९७५, पृ. ६९.
६. गो. म. कुलकर्णी, संपा. द. दि. पुंडे, *गांधीवाद आणि आधुनिक मराठी साहित्य*, पुणे. प्रतिमा प्रकाशन- १९८५, पृ. २१.
७. तत्रैव, पृ.३७.
८. तत्रैव, पृ.३८.
९. तत्रैव, पृ.४०.
१०. तत्रैव, पृ.४४.
११. तत्रैव, पृ.४४.

# चोम्स्की : एक मोठे विचारवंत

अशोक कृष्णाजी जोशी

नोम चोम्स्कींचा जन्म अमेरिकेतल्या फिलाडेल्फिआत झाला. त्याच्या वडिलांचा जन्म मात्र आधीच्या रशियातल्या युक्रेनमध्ये झाला होता. ते ज्यू होते व हिब्रू भाषेचे विद्वान हेते. १९१३ मध्ये ते अमेरिकेत आले व फिलाडेल्फिआत नोमचा जन्म ७ डिसेम्बर १९२८ला झाला. त्याचे शालेय शिक्षण तेथेच झाले. पेनसिल्वानिआ विद्यापीठाकडून त्याला बी. ए. पदवी १९४९ मध्ये मिळाली, तर १९५१ मध्ये एम. ए. पदवी मिळाली. अत्यंत हुशार असलेल्या व भाषाशास्त्रात विशेष गती असणाऱ्या नोमने काही महिने इस्राएलमध्ये एका किबुत्झमध्ये घालवले. मग १९५५ मध्ये त्यांना एम. आय. टी. या जगप्रसिद्ध शिक्षणसंस्थेत शिकवायची नोकरी मिळाली. आज ९२ व्या वर्षीदेखील ते त्याच संस्थेशी संलग्न असून त्यांचे विद्यादानाचे काम आजही चालू आहे. आता भाषाशास्त्र न शिकवता ते आता आपल्याला पटलेले मत लोकांसमोर मांडून जनजागृती करीत असतात. इतर ठिकाणच्या वस्तुस्थितीप्रमाणेच अमेरिकन लोकमतही राष्ट्रवादी असणे स्वाभाविकच आहे. चोम्स्की मात्र जागतिक सरकार, आंतरराष्ट्रीयवाद व मानवतावाद यांचा सतत पाठपुरावा करतात.

चोम्स्की ज्यू असल्यामुळे त्यांचे बालपण ज्यू वस्तीत गेले. चांगल्या आर्थिक परिस्थितीत असलेले चोम्स्की लहानपणी आजूबाजूला असलेल्या गरीब ज्यू वस्तीत वाढले. त्या वस्तीतले लोक जरी गरीब होते, तरी सांस्कृतिक दृष्ट्या ते समृद्ध होते. त्यांची बौद्धिक तयारी चांगली होती. डाव्या विचारसरणीचा तिथल्या ज्यू लोकांवर प्रभाव होता. ते लोक करीत असलेल्या चर्चा ऐकण्यात चोम्स्कींचे बालपण गेले. चोम्स्कींनी लहानपणी चांगल्या शाळेत शिक्षण घेतले. उच्च शिक्षणासाठी ते पेनसिल्वानिआला गेले. तिथे त्यांना भाषाशास्त्र, तर्कशास्त्र, तत्त्वज्ञान या विषयांत विशेष रस होता. भाषाशास्त्रात पीएच. डी. करीत असताना त्यांनी मेथड्स इन स्ट्रक्चरल लिंग्विस्टिक्स हा अभ्यासविषय घेतला होता. तिथे झिलिग हॅरिस (Zillig Harris) यांचा त्यांच्यावर फार प्रभाव पडला. १९५३ मध्ये ते आपल्या पत्नीसह इस्राएलमधल्या एका किबुत्झमध्ये राहायला गेले. शारीरिक श्रम व बौद्धिक श्रम यांचे मिश्रण असलेले ते वास्तव्य होते. पण ६ आठवड्यांच्या तिथल्या आनंदी वास्तव्यानंतर चोम्स्कीना आपला पी. एचडी.चा अभ्यास पुढे चालू ठेवण्यासाठी जी शिष्यवृत्ती मिळाली होती तिच्या निमित्ताने अमेरिकेला जावे लागले. १९५५ मध्ये एम. आय. टी. या जगप्रसिद्ध संस्थेत त्यांना आवडणारी शिकवण्याची नोकरी मिळाली व तेव्हापासून आजतागायत ते त्याच शिक्षणसंस्थेत कार्यरत आहेत.

चोम्स्कीनी साम्यवादी विचारप्रणालीतले व विशेषतः लेनिनवादी विचारप्रणालीतले दोष सतत दाखवले आहेत. स्थितिवाद, वंशवाद व खास अधिकार या गोष्टींना त्यांनी नेहमीच विरोध केला आहे. शास्त्र, समाजशास्त्रे व भाषाशास्त्र यांची एक परंपरा आहे, ती अभ्यासकांनी समजून घेणे आवश्यक आहे, असे चोम्स्कीनी आपल्या मुलाखतीत जेम्स पेक यांना सांगितले. त्या विशिष्ट ज्ञानविषयातले सिद्धान्त, गृहीतके समजून घेणे आवश्यक आहे, असे चोम्स्की त्या मुलाखतीत म्हणतात. चोम्स्कींना कोठल्याही विशिष्ट अशा विचारसरणीत रस नाही. स्वातंत्र्य देणाऱ्या शिक्षणसंस्था, तशीच स्वातंत्र्य या मूल्याची कदर करणारी समाजरचना त्यांना आवडते, असे ते त्या मुलाखतीत म्हणतात. त्यांना विचारप्रणालीरहित विचारांचे म्हणजे कोणत्याही विचारसरणीला बांधील नसलेल्या विचाराचे आकर्षक आहे, म्हणजे अनार्किझम त्यांना खुणावतो. अनार्किझम म्हणजे निर्नायकी असा अर्थ होत नाही. अनार्किझमचा अर्थ कोणत्याही विचारसरणीला बांधील नसणे असा होतो, असा चोम्स्कींचा दावा आहे. आपल्या समाजात लोकाभिमुख संघटना असाव्यात, सर्व सामाजिक प्रश्नांवर गंभीर चर्चा व्हावी,

सर्व समस्यांचे नीट विश्लेषण व्हावे व खुली चर्चा, वादविवाद व्हावेत, असे त्यांना वाटते, हे त्या मुलाखतीत स्पष्ट होते.

अमेरिकेच्या परराष्ट्रधोरणावर टीका करताना ते धोरण आत्मकेंद्री असून पैसेवाल्या भांडवलदारांचे हित ते पाहते व सामाजिक विषमता दूर करण्याचा विचार आणि दूरदृष्टी त्यात नाही, अशी अमेरिकन सामान्य लोकांना व राजकारण्यांना न आवडणारी टीका त्या धोरणावर चोम्स्की करीत असतात. १९६७ पासून त्यांनी अमेरिकेच्या विएतनाम धोरणावर टीका केली आहे. विएतनाम युद्ध अमेरिकेने विएतनाम वर लादले होते, हे त्यांचे मत लोकमतविरोधी पण सदसद्विवेकबुद्धीला धरून होते. अमेरिकेच्या अतिपूर्वविषयक परराष्ट्रधोरणावर टीका करताना त्यांनी कम्बोडिआविषयक, कोरिआविषयक व अलीकडे मध्यपूर्वविषयक अमेरिकन धोरणावर प्रखर टीका केली आहे.

रसेल व सार्त्र हे १९६० च्या दशकातले मोठे विचारवंत व जागतिक सदसद्विवेकबुद्धीचे प्रतिनिधित्व करणारे विचारवंत म्हणून सर्वत्र प्रसिद्ध होते. १९८० नंतर ते स्थान चोम्स्कींना मिळाले आहे. आजच्या जगातले सर्वश्रेष्ठ विचारवंत म्हणून त्यांना सर्वमान्यता मिळाली आहे. अमेरिकेचे नागरिकत्व असलेले व अमेरिकेत राहणारे चोम्स्की जेव्हा अमेरिकेच्या धोरणावर टीका करतात, तेव्हा बुद्धिवंतांची विचार करण्याची शक्ती देशाच्या सीमा ओलांडून सर्व मानवजातीचा दूरदृष्टी समोर ठेवून विचार कसा करते, याचा वस्तुपाठच आपल्याला मिळतो. पन्नास वर्षांपेक्षा अधिक काळ ही माणसाची सदसद्विवेक जागवणारी भूमिका(conscience keeper ची भूमिका) चोम्स्कींनी फार इमानेइतबारे बजावली आहे. २००५ मध्ये त्यांना जगातले सर्वश्रेष्ठ बुद्धिवंत म्हणून निवडले गेले. हा त्यांचा सर्वांत मोठा सन्मान होता.

*द चोम्स्की रीडर* हे पुस्तक समोर ठेवून इथे विचार करू. हे पुस्तक जेम्स पेक (James Peck) यांनी संपादित केले आहे व न्यूयॉर्कच्या पॅंथिअन बुक्सने १९८७ ला ते प्रसिद्ध केले. (याशिवाय इतरही साधनांचा वापर या लेखात केला आहे.) माणसाचा माणूस म्हणून असलेला आब वा dignity राखणे, स्वातंत्र्य या मूल्याची जपणूक करणे, उदारमतवादाचा आग्रही स्वीकार करणे, मानवतावाद सर्वश्रेष्ठ मूल्य मानणे, कोणत्याही प्रश्नाकडे वस्तुनिष्ठपणे पाहणे, कोणत्याही विचारप्रणालीला (ideology) तसेच परंपरेला बांधून न घेणे ही चोम्स्कींची ठळक वैशिष्ट्ये असे म्हणता येते.

सत्तेची ओढ व अमेरिकेचे विशेष अधिकार या कल्पनांनी अमेरिकन स्वातंत्र्यकल्पना वेढलेली असून तीमध्ये जबाबदारीचे तत्त्व टाळण्याकडे अमेरिकेचा कल दिसतो आहे, असे चोम्स्कींचे मत आहे. अमेरिकन मनाचे वैचारिक शिक्षणच (indoctrination) तसे झाले असून दुसऱ्यांच्या दुःखाबाबत ते संवेदनाहीन झाले आहेत, असे चोम्स्की म्हणतात. विएतनाम, सेंट्रल अमेरिका, व मध्यपूर्व देशांतल्या लोकांच्या वेदना अमेरिकेतल्या जनतेला जाणवत नाहीत, हे चोम्स्कींना विचित्र वाटते. मग अमेरिकेचे धोरणच मानवी स्वातंत्र्य व माणसाची डिग्निटी dignity विरोधी आहे का, अशी शंका चोम्स्कींना येते.

जे निर्घृण असतात, लबाड असतात, लोभी असतात, स्वार्थी असतात, ज्यांच्याकडे दयाबुद्धी नसते, सहानुभूती नसते, जे सत्तेपुढे झुकतात, भौतिक सुखांकरिता जे तत्त्वे विसरतात, त्यांच्यावर चोम्स्की टीका करतात. अमेरिकेने स्वतःची जी प्रतिमा निर्माण केली आहे व अमेरिकन स्वप्न ही कल्पना निर्माण केली आहे, ती चोम्स्कींना टीका करण्यासारखी वाटते. आलंकारिक भाषा वापरून सर्वच देश आपल्या देशाचेच हित समोर ठेवीत असतात. त्या देशांतील पैसेवाला वर्ग व शक्तिमान राजकारणी गट त्या त्या देशाचे राजकीय धोरण ठरवीत असतात. अमेरिकाही याला अपवाद नाही. हुकूमशाही देशात लोकांचा आपल्या धोरणाला रुकार मिळवण्याचा एक मार्ग असतो, तर अमेरिकेसारखा लोकशाही देश रुकाराचे वेगळे मार्ग चोखाळतो. ते मार्ग फार सूक्ष्म असतात, आपल्या ते पटकन लक्षात येत नाहीत. अशा लोकशाही व्यवस्थेत स्वातंत्र्याची झूल पांघरून ब्रेनवॉशिंग केले जाते. विएतनाम युद्ध सुरू करताना, इराक व अफगाण युद्धाच्या वेळी व इतर अनेक वेळी असेच केले गेले, हे चोम्स्की दाखवून देतात.








The Resposibility of Intellectuals हा या पुस्तकातला लेख मुख्यतः ३ मुद्दे समोर आणतो. १)ड्वाइट मॅकडोनाल्ड (Dwight Macdonald) या विचारवंताने *Politics* या मासिकात काही लेख १९६६ मध्ये लिहिले व त्यात युद्धासंबंधी जी अपराधीपणाची भावना व विशेषतः युद्धादरम्यान जे गुन्हे घडतात त्याविषयी लिहिले. त्या लेखांना केंद्रभागी ठेवून चोम्स्कींनी विचारवंतांची (नैतिक) जबाबदारी काय याविषयी मुक्त चिंतन केले आहे. सरकार जे सत्य दडवते, ते सत्य उजेडात आणण्याचे काम बुद्धिवंत करू शकतात; पाश्चिमात्य जगातल्या राजकीय व्यवस्थेमुळे हे शक्य आहे, असे चोम्स्कींचे मत आहे. पण बरेच विचारवंत व विद्यापीठातले विचारवंत सरकारपक्षाला व सरकारी धोरणाला पाठिंबा देतात, हे अनेक उदाहरणांनी चोम्स्की दाखवून देतात. २) एखाद्या विषयातले विशेषज्ञ किंवा स्पेशलिस्ट या लोकांवर आपल्या टीकेचा रोख वळवताना चोम्स्की या विशेषज्ञ कल्टवर टीका करतात. हे विशेषज्ञ सरकारला सोयीचे असणारे उपाय सुचवतात व सरकारी धोरणांचाच पुरस्कार करतात, हा चोम्स्कींच्या टीकेचा रोख आहे. ३) आपल्या लेखात डॅनिअल बेल (Daniel Bell) या लेखकाच्या गाजलेल्या *The End of Ideology* या पुस्तकाच्या संदर्भात ते मत व्यक्त करतात, की बुद्धिवंत आपले हितसंबंध बाजूला ठेवून विचार करतात/करू शकतात, हे गृहीतक प्रत्यक्ष अनुभवावर आधारित नाही. बुद्धिवंत सामाजिक सुधारणा किंवा समाजाचे वैचारिक व व्यावहारिक उत्थान करण्याच्या दृष्टीने प्रयत्न करतात, हे केवळ गृहीतकच आहे. बुद्धिवंत बरोबर असतात व ते वस्तुनिष्ठ पद्धतीने कसे विचार करतात, याचे विवेचन मात्र बेलने केले नाही. बेलचे तांत्रिक विशेषज्ञांविषयीचे विश्लेषण हे आपल्या क्षेत्रातले प्रश्न सोडवण्याचे उपाय ते विशेषज्ञ सुचवतात या गृहीतकावर आधारित आहे. पण अखेरीस राजकीय धोरणांवर ते उपाय अवलंबून असतात व विशेषज्ञ राजकीय धोरण ठरवीत नाहीत, हे सत्य नजरेआड करता येणार नाही. समृद्धीबरोबर गरिबीही अस्तित्वात आहे, हे आजचे वास्तव आपल्या सर्वांना स्वीकारावे लागेल, असे चोम्स्की म्हणतात.

बुद्धिवंतांच्या वस्तुनिष्ठतेवर भाष्य करताना एक उदाहरण म्हणून चोम्स्कींनी गॅब्रिअल जॅक्सन (Gabriel Jackson) यांचे स्पॅनिश सिविल वॉरवरील प्रमाणभूत म्हणून मानले गेलेले *The Spanish Republic and the Civil War : 1931-1939* (प्रिन्स्टन, न्यू जर्सी : प्रिन्स्टन युनिवर्सिटी प्रेस, १९६५) हे पुस्तक विचारासाठी घेतले आहे. चोम्स्कींच्या मते जॅक्सनचे हे पुस्तक वस्तुनिष्ठ व पुरेसे ऐतिहासिकही नाही. जॅक्सनने काढलेले निष्कर्ष हे उदारमतवादी पण वरच्या वर्गातील बुद्धिवंतांचे पूर्वग्रह व्यक्त करणारे विचार आहेत. कॅटालोनिआच्या टेलीफोन एक्स्चेन्जमधल्या क्रांतिकारी कामगारांमधला व कामगार-पुढाऱ्यांमधला बेबनाव वर्णन करताना जॅक्सनचे हे पूर्वग्रह स्पष्ट होतात. त्याने ऐतिहासिक पुराव्यांवर आधारित काम केले नाही, असा चोम्स्कींचा दावा आहे. जॅक्सनचा स्पॅनिश क्रांतीबाबत दृष्टिकोण नकारार्थी असल्याने त्याचे त्या क्रांतीचे चित्रण त्या पुस्तकात वस्तुनिष्ठ झालेले नाही, असे चोम्स्कींचे म्हणणे आहे. फ्रँकोच्या सेनेने केलेले दमन त्याने लक्षात घेतले नाही, असे चोम्स्की म्हणतात. जॅक्सनचे पुस्तक चांगले असले, तरी उदारमतवादी विद्वत्तेचा नमुना म्हणून त्याकडे पाहिले पाहिजे. वस्तुनिष्ठतेचा अभाव व स्पॅनिश सिविल वॉरसंबंधी त्याचा पूर्वग्रहावर आधारलेला दृष्टिकोण हे त्या पुस्तकाचे विशेष नजरेआड करता येत नाहीत.

ब्रिटिश सरकारचे हितसंबंध फ्रँकोचे सरकार जपते, हे ध्यानात घेऊन ब्रिटिशांनी फ्रँकोच्या सैनिकांनी केलेल्या दमनाकडे डोळेझाक केली आणि जर्मनांनी हे लवकरच ताडले, असे चोम्स्की म्हणतात. १९५७ सालीदेखील ब्रिटिश व अमेरिकन सरकारे फ्रँकोसरकारची स्तुती करीत होती, असे निरीक्षण चोम्स्की करतात. अखेरीस सर्व प्रकारची सरकारे आपले व आपल्या देशातल्या हितसंबंधी लोकांचे हितसंबंध महत्त्वाचे मानतात, हेच खरे.

सरकारी धोरणांना लोकांचा व बुद्धिवंतांचा कसा होकार मिळतो, हे चोम्स्की आपल्या The Manufacture of Consent या लेखात दाखवतात.

अमेरिकन लोक मोठ्या गर्वाने सांगतात, की त्यांचे सरकार इतर लोकांना जिंकत नसते, तर त्यांचा आपल्या धोरणाला होकार मिळवत असते; म्हणजे ते लोकशाही




मार्गच अवलंबत असते. स्वातंत्र्य, जगण्याचा हक्क व सुखसमृद्धीचा अविरत पाठपुरावा हे अमेरिकन सद्‌गुण असून लोकांची मने जिंकूनच अमेरिकन सरकार आपले धोरण राबवते, हे अमेरिकन लोकांचे म्हणणे खरे नाही; ते एक असत्य आहे, असे चोम्स्की म्हणतात. अमेरिकेतले शिक्षित लोकच अमेरिकन विचारप्रणालीने प्रभावित झाले असून ते अंधश्रद्ध झाले आहेत; ते अज्ञानी झाले असून सत्य पाहत नाहीत असा उद्विग्न विचार चोम्स्की व्यक्त करतात. हिंसा व प्रचार या साधनांचा वापर करून शासन लोकांच्या विचारावर हुकमत गाजवते, त्यांना नियंत्रणात ठेवते. त्यांच्यावर सार्वभौम सत्ता गाजवून शिक्षितांना अलीकडचा इतिहासही विसरायला लावते. त्यांच्यात सामुदायिक विसराळूपणा आणते.

आपण वंशवादी नाही असे अमेरिकन लोक मोठ्या गर्वाने सांगतात; पण जे युरोपीय मूळ नसलेले अमेरिकन नागरिक आहेत, त्यांना ते दुय्यम दर्जाचे मानतात हे कटू सत्य आहे. म्हणजे वंशवादी नसल्याचा त्यांचा दावा खरा नाही. अमेरिकेत वास्तव्यास येण्याच्या वेळी इथल्या मूळ लोकांचा म्हणजे इंडिअन अमेरिकन लोकांचा त्या वेळच्या गोऱ्या लोकांनी नरसंहार केला, हा काळा इतिहास फार जुना नाही. कोलंबसाच्या काळी अमेरिकेत ८ कोटी अमेरिकन इंडियन होते; १८ व्या शतकात फक्त २० लाख अमेरिकन इंडियन उरले होते, हा विदारक इतिहास चोम्स्की स्पष्टपणे दाखवतात. तेव्हा शासनाकडून सर्वसामान्यांचा रुकार कसा मिळवला जातो व त्यांचे 'प्रबोधन' कसे केले जाते, याचे मोठे विदारक चित्रच चोम्स्की नीट काढतात. (पा. १२१-१२२).

**चोम्स्की व वर्तनवाद**

बी. एफ. स्किनर (B. F. Skinner) विसाव्या शतकाच्या उत्तरार्धातला फार मोठा मानसशास्त्रज्ञ मानला जातो. वर्तनवाद वा behaviourism च्या अगदी सुरुवातीच्या काळातला तो मोठा सैद्धान्तिक आहे. चोम्स्की हे मानसिक घटनांना महत्त्व देणारे मेंटॅलिस्ट(mentalist) आहेत. तेव्हा त्या दोघांच्या विचारांत टोकाचा विरोधीपणा असणारच, हे स्पष्ट आहे. स्किनरच्या *Beyond Freedom and Dignity* या पुस्तकाचे दीर्घ परीक्षण चोम्स्कींनी New York Review of Books या साप्ताहिकात ३० डिसेंबर १९७१ च्या अंकात लिहिले. त्या निमित्ताने त्यांनी स्किनरच्या संपूर्ण विचाराचाच आढावा घेतला आहे. Psychology and Ideology या शीर्षकाखाली त्यातला मुख्य भाग या पुस्तकात घेतला आहे.

स्किनरने आपल्या सिद्धान्तात परिस्थितीला किंवा वातावरणाला सर्वाधिक महत्त्व दिले होते. त्यांच्या मते परिस्थिती किंवा वातावरणच सर्व घटक नियंत्रित करतात. माणसाचे जन्मदत्त किंवा जेनेटिक घटक महत्त्वाचे असतात, हे मान्य करूनही स्किनर म्हणतो, की परिसस्थितिजन्य घटक जर अधिक बळकट केले व प्रभावित केले, तर माणसाच्या वागणुकीचे नियंत्रण करता येते, तिला पाहिजे तसा आकार देता येतो, पाहिजे ती दिशा माणसांच्या वागणुकीला देता येते. स्किनरचे हे म्हणणे सर्वगामी अशा हुकूमशाही सत्तांचे म्हणणेच आहे व होते, हे स्पष्टच आहे.

स्किनचा वर्तनवादी सिद्धान्त मानसिक घटकांचे महत्त्व मानणाऱ्या चोम्स्कींना मान्य होणे शक्य नव्हते. चोम्स्की म्हणतात, की स्किनरचा सिद्धान्तच विज्ञान-विरोधी आहे. स्किनर माहितीसिद्धान्ताच्या विरोधी भूमिका घेतो, त्याचा सिद्धान्त पूर्वानुमानी (a priori) स्वरूपाचा आहे, त्याची वातावरणातले बळ देणारे (reinforce) घटक ही कल्पना रूपकात्म किंवा metaphorical आहे, त्याचा वर्तनवादी सिद्धान्तच अस्पष्ट स्वरूपाचा, आशयहीन व माहितीवर आधारित नसलेला असा आहे, असे ते म्हणतात.

स्किनरच्या सिद्धान्तावरची टीका पुढे चालू ठेवताना चोम्स्की म्हणतात, की स्वातंत्र्य व माणसाचे माणूकपण, त्याचा आब (dignity) हे पारंपरिक गूढ गोष्टींवर आधारलेले नुसते तर्क वा अंधविश्वासस्वरूप घटक नाहीत. वर्तनवादी विचारक मानतात तसे ते जुन्या काळच्या गोष्टींचे उर्वरित स्वरूपाचे घटकही (residue) नाहीत. माणसाची नैसर्गिक वृत्ती त्याच्यात स्वातंत्र्याची ओढ निर्माण करते, त्याला निर्मितिक्षम बनवते, सतत शोध घेण्याची वृत्ती त्याच्यात निर्माण करते. माणूस केवळ आपल्या शारीरिक गरजाच पाहत नाही, त्याला मानसिक गरजा असतात; केवळ यांत्रिकपणे तो जगत वावरत नाही,









बऱ्याचदा त्याचे वागणे आपल्याला आधीच सांगता येत नाही.

हिंसा, दमन, अभाव निर्माण करणे, बक्षिसाची लालूच दाखवणे असे अनेक प्रयोग करून माणसांवर नियंत्रण ठेवण्याचा सतत प्रयत्न केला गेला आहे. पण काही माणसे भीती व असुरक्षा यांची तमा न बाळगता हुकुमशाही प्रवृत्तीसमोर झुकत नाहीत, त्यांना शरण जात नाहीत. मानवी स्वातंत्र्य व माणूसपणाचा ध्वज उंचावत राहतात. वर्तनवाद हे लक्षात घेत नाही म्हणून तो गैरलागू आहे, असे चोम्स्की म्हणतात.

स्किनरने माणसाचा एक यंत्र म्हणून विचार केला व त्याप्रमाणे आपला वर्तनवादाचा सिद्धान्त मांडला. माणसाच्या मनाचा अधिक विचार करणारे चोम्स्की वर्तनवाद मानणे शक्यच नव्हते. ते माणसाचे मन या कल्पनेला व मनाच्या विविध शक्तींना महत्त्व देणारे विचारवंत आहेत. स्किनरचा वर्तनवादी विचार त्यांना पटणे व आवडणे कठीण आहे.

## चोम्स्कींचा भाषाविषयक विचार

चोम्स्कींच्या भाषाविषयक विचारांचा आढावा घेऊन त्यांची स्वातंत्र्य ही कल्पना काय आहे, याचा विचार करणे योग्य होईल. आपल्या लिखाणात चोम्स्कीनी हंबेल्ट या पूर्वसूरीचा उल्लेख केला आहे. १८ व्या शतकातल्या हंबोल्टने म्हटले, की औद्योगिक युगातला स्वतंत्र माणूस शासनापासून मुक्त असेल, कोठल्याही अधिसत्तेपासून तो मुक्त असेल, आपल्या अंगच्या सर्व सुप्त गुणांचा, शक्तींचा विकास करणारा असेल, त्याचा दृष्टिकोण अनावश्यक बंधने नाकारणारा असेल. औद्योगिक क्रांतीच्या पुढल्या टप्प्यातले चित्र अशा प्रकारचे असेल, असे हंबोल्टने म्हटले होते.

भाषेसंबंधी विचार मांडताना हंबोल्टने म्हटले आहे, की भाषा हा मुक्त निर्मितीचा उद्‌गार असतो. भाषेचे नियम व तत्त्वे निश्चित असतात; पण भाषेचे ज्या रीतीने विविध व मुक्त आविष्कार होतात, वेगवेगळी नवी वाक्ये भाषेमध्ये ज्या प्रकारे वापरली जातात, त्यामुळे भाषा हे वेगळे मानवी रूप किंवा माणसाचा वेगळा अविष्कार ठरतो.

शिलिंग (Schelling) हा हंबोल्टनंतरचा विचारवंत सांगतो, की मानवी निर्मितिक्षमता, संदेशवहन व अर्थपूर्ण कृती, आवश्यकता व स्वातंत्र्य (necessity and freedom) यांमधील तणावावर अवलंबून असते. चोम्स्कींना हा तणावाचा विचार महत्त्वाचा वाटतो. ही परंपरा त्यांना भविष्यातल्या समाजाच्या घडणीच्या दृष्टीने महत्त्वपूर्ण वाटते.

मानवी मनाला महत्त्व देणारा असा दृष्टिकोण, तो वापरून केलेले परिस्थितीचे चित्रण व मानवी स्वभावाविषयीचा आपला विचार भविष्यातल्या समाजव्यवस्थेचे आपले व्हिजन ठरवतो असे चोम्स्कींचे म्हणणे आहे. ते सांगतात, की मानवी भाषेचा आपला अभ्यास मानवाविषयीची आपली समज व्यक्त करतो, माणसाच्या वागणुकीचे नियम त्या अभ्यासातून स्पष्ट होतात. त्या नियमांच्या चौकटीत मानवी कृती कशी निर्मितिपूर्ण व मुक्त स्वरूपाची घडेल ते या अभ्यासातून स्पष्ट होते, कारण त्यातून मानवी मनाच्या अगदी खऱ्याखुऱ्या कोपऱ्यांचे दर्शन घडते.

वर्तणुकीच्या नियमांनी भाषेची व्यवस्था स्पष्ट होत नाही. त्यासाठी आपल्याला मनाच्या अभ्यासाकडे वळावे लागेल, हंबोल्टच्या भाषासंकल्पनेकडे वळून आपल्याला भाषेचा अभ्यास करावा लागेल. माणसाच्या मनातच भाषेचे नवे नवे आविष्कार अनुस्यूत असतात व तिथेच भाषाव्यस्था ठरत असते व अगदी मर्यादित साधनांतून अमर्याद निर्मिती होत असते, असे चोम्स्की म्हणतात. ते म्हणतात, की भाषेचा अगदी बारकाईने अभ्यास केला, तर स्वातंत्र्य, सामाजिक न्याय, सामाजिक कृती या दृष्टीने पुढे टाकलेले मानवी भाषा हे एक पाऊल ठरते. माणसाचे वागणे बदलण्याच्या दृष्टीने पुढे टाकलेले ते पाऊल असते. जनरेटिव ग्रामर म्हणजे मनातले हे भाषेसंबंधीचे अध्याहृत नियम व तत्त्वे होत. हेच भाषेचे नियम आवाज व अर्थ यांतील संबंध स्पष्ट करीत असतात. युनिवर्सल ग्रामर म्हणजे भाषेचे सर्वसाधारण नियम व भाषेची संघटना व विविध घटक स्पष्ट करणारे व्याकरण. सर्व प्रदेश व भाषांच्या बाबतीत हे वैश्विक व्याकरण किंवा युनिवर्सल ग्रामर अस्तित्वात असते. माणसांना जन्मजातच भाषा संपादन करण्याची शक्ती असते, त्यांना जन्मापासूनच भाषाशास्त्रीय नियमांवर आधारलेली वाक्ये

बनवण्याची शक्ती प्राप्त झालेली असते. महत्त्वाच्या भाषाशास्त्रीय संकल्पनानी त्यांचे भाषाविषयक ज्ञान स्पष्ट करता येते. प्रत्येक भाषेची वैशिष्ट्ये जरी वेगळी असली व प्रत्येक भाषा दुसऱ्या भाषेपासून वेगळी असली, तरी सर्व भाषांचे युनिवर्सल ग्रामर किंवा वैश्विक व्याकरण असते व ते मानवी मनात असते, मानवी मेंदूत प्राणिशास्त्राला अनुसरूनच तसे असते, हे चोम्स्कींचे मत १९५० च्या दशकात प्रचलित असलेल्या वर्णनात्मक भाषाशास्त्रीय विचारापेक्षा फार वेगळे व क्रान्तिकारक होते. म्हणून चोम्स्कींचा हा विचार भाषाशास्त्राला नवे वळण देणारा ठरला.

सर्जनशीलता वा निर्मितिक्षमता ही भाषेची महत्त्वाची शक्ती मानवी भाषेला निर्मितिक्षम बनवते. भाषेच्या वाक्यांना सरफेस स्ट्रक्चर व डीप स्ट्रक्चर असे दोन भाग असतात. त्यांतला डीप स्ट्रक्चर हा भाग वाक्याचा दडलेला भाग किंवा तळचा अर्थ स्पष्ट करतो, पृष्ठभागचे वाक्य किंवा सरफेस स्ट्रक्चर वाक्याचा वरवरचा अर्थ स्पष्ट करते. सर्व मानवी भाषांची रचना अशाच रीतीने झालेली आहे हे चोम्स्मींचे मत केवळ गणितावर आधारलेले नाही, तर आपला अनुभवही तेच दाखवतो. भाषेचे तीन भाग असतात– १) रचनात्मक भाग किंवा स्ट्रक्चरल भाग, २) सिंटॅक्टिक भाग (यातच वाक्याचा पृष्ठस्तरीय भाग व तळचा अर्थ असलेला भाग असे दोन भाग असतात), ३) भाषेतला आवाजाशी निगडित असलेला भाग किंवा फोनॉलॉजिकल भाग.

चोम्स्कींचा भाषाशास्त्रीय विचार गणितशास्त्रावर आधारलेला होता. त्यामुळे त्याला शास्त्रीय मान्यता मिळणे सोपे झाले. वर्तनशास्त्र मानणाऱ्या विरोधी विचाराला तो खोडणे कठीण झाले. मर्यादित वाक्यरचनेचे सामर्थ्य असलेला माणूस अमर्याद व कधीही न वापरली गेलेली अगदी नवी वाक्ये कशी वापरतो, न शिकलेली वाक्ये व शब्द माणूस कसे वापरतो हे कोडे चोम्स्कींनी आपल्या परीने सोडवले. माणसाची निर्मितिक्षमता, मानवी भाषेतला स्वैरपणा किंवा आर्बिट्ररीनेस, स्टिम्युलसचे महत्त्व, स्वातंत्र्य ही मानवी व्यवहाराच्या केंद्रभागी असलेली कल्पना व अफाट आणि अमर्याद वाक्यरचनेची मानवी क्षमता या गोष्टींवर भर देऊन चोम्स्कींनी भाषाशास्त्राला एक वेगळी दिशा दिली.

भाषेची रचना महत्त्वाचे मानणारे भाषाशास्त्र (structural linguistics) ही चोम्स्कींच्या काळात प्रभावी असलेली भाषाशास्त्राची अभ्यासशाखा त्यांनी नाकारली; त्याजागी transformational grammar ही ज्ञानशाखा प्रस्थापित केली. मानवी भाषा मनातचर रुजलेल्या असतात हे त्यांचे म्हणणे पाणिनीच्या अष्टाध्यायीला जवळ जाणारे आहे. पाणिनीकडून आपल्याला मर्मदृष्टी (insight) मिळाली असे चोम्स्कींनी नोंदवले आहे.

माणसाकडे, मानवी मुलाकडे भाषासंपादन करणारे साधन असते (LAD - Language acquisition device किंवा भाषा आत्मसात करायला मदत करणारे साधन) व त्यामुळेच माणूस मर्यादित भाषासाधनातून अमर्याद शब्द व वाक्ये निर्माण करू शकतो व हे सर्वच मानवी भाषांबाबत खरे आहे, असे चोम्स्की म्हणतात.

**समानता व चोम्स्की**

चोम्स्कींचा विचार लक्षात घेता समानतेचे तत्त्व या विचारांत महत्त्वाच्या स्थानी असणे अपेक्षितच आहे. समानता या संकल्पनेचे ३ प्रकार आहेत, असे ते म्हणतात. १) हक्कांची समानता, २) परिस्थितीतील समानता, ३) endowment ची किंवा प्रोत्साहन देणाऱ्या पद्धतींची समानता. या तिन्ही प्रकारच्या समानता मानवी स्वभावाच्या वैविध्यतेशी जोडल्या गेलेल्या आहेत.

सरकारचे सर्व कार्यक्रम हे समानता हे तत्त्व लक्षात घेऊन आखलेले असतात, हे काही विचारवंतांचे मत – उदाहरणार्थ, जॉन कॉबचा (John Cobb) बिझिनेस वीक च्या डिसेंबर १९७५च्या अंकातला लेख- चोम्स्कींना अजिबात मान्य नाही. चोम्स्कींच्या मते सरकारी खर्च मोठ्या उद्योगांचे व भांडवलदारांचे हित लक्षात घेऊन केलेले असतात. शस्त्र निर्माण करणाऱ्या कंपन्यांना सूट (subsidy) दिली जाते. समानता निर्माण करण्याच्या दृष्टीने सरकारची धोरणे आखलेली नसतात. खाजगी उद्योगक्षेत्र ही मोठी आर्थिक शक्ती असते, म्हणून ती सवलत दिली जाते. त्याचा उद्योगांच्या कार्यक्षमतेशी काही संबंध नसतो. प्रचारमाध्यमे, लोकांची मते घडवणारी वृत्तपत्रे, शाळा, महाविद्यालये, विद्यापीठे ह्या सर्व संस्था

भांडवलदारांचे व खाजगी उद्योगांचे हित पाहतात, असे चोम्स्कींना वाटते.

मानवी मेंदू हेच मानवी भाषेचे केंद्र असून कित्येक शतकांच्या मानवी उत्क्रांतीमध्ये मानवी स्वभाव फार बदललेला नाही. (मानवी जीवनशैली फारच बदललेली असली तरी.) माणसाला स्वतंत्र किंवा बंधनमुक्त स्वरूपाची निर्णयशक्ती आहे, हे तत्त्व जरी मान्य केले, तरी मानवी संस्था व माणसामाणसांमधील संबंध ऐतिहासिकतेने ठरतात, हेच खरे आहे. मानवी मेंदू वैशिष्ट्यपूर्ण आहे व माणसाच्या मनातील संरचना जन्मदत्त आहेत, तसेच अनुभव व परिस्थितीशीही संबंधित आहेत, असे चोम्स्की म्हणतात. पण मानवी व्यवहाराच्या सर्वच गोष्टी शिकलेल्या (learned) असतात किंवा अनुभवावर आधारलेल्या असतात; हा वर्तनवाद्यांचा दावा त्यांना मान्य नाही. अनुभवाला व शिकण्याला महत्त्व देत असतानाच मानवी मनाच्या वैशिष्ट्यपूर्ण घडणीकडे लक्ष द्यावेच लागते. भाषा हे असेच निसर्गदत्त मानवी साधन आहे. चोम्स्की म्हणतात, "A highly constranied genetic programme determiner the basic structural properties of our 'mental organs' thus making it possible for us to attain rich and lintricate systems of knowledge and belief in a unique manner on the basis of quite limited evidence." (p.197)

माणसांच्या निसर्गदत्त शक्तीमध्ये फरक असतो, प्रत्येकाची बुद्धिमत्ता वेगळी असते व वेगवेगळ्या गोष्टींत त्यांना रस असतो, हे चोम्स्कींना मान्य आहे. पण माणूस म्हणून आपल्याला एक चौकट मिळते, त्या चौकटीतच आपण सर्जनशील काम करीत असतो व दुसऱ्यांनी केलेले काम नावाजत असतो. दुसऱ्यांनी केलेले काम नावाजणे, त्याचे महत्त्व जाणणे हीपण एक मानवी शक्ती आहे. एकच माणूस सर्वकाही करू शकत नाही. म्हणूनच दुसऱ्यांच्या बौद्धिक व मानसिक शक्ती फुलवायला मदत करणे, त्यांनी केलेले काम नावाजणे हे मानवी स्वभावाचे मोठे महत्त्वाचे काम आहे. ह्याचा मानवी समानता या कल्पनेशी जो संबंध आहे, तो नीट समजून घेतला पाहिजे. चोम्स्की काही लोकांना विशेषाधिकार देण्याच्या आज प्रचलित असलेल्या प्रथेविरुद्ध सतत बोलत राहिले आहेत. माणसातले जन्मदत्त गुण फुलवले पाहिजेत, असे ते म्हणतात, विशेष कर्तबगारी दाखवणाऱ्यांचे कौतुक करणे त्यांना मान्य आहे; पण त्याबद्दल त्यांना वेगळे व अधिक पैशाच्या रूपातले मूल्य देणे त्यांना मान्य नाही. समानता व समान हक्क या तत्त्वांविरोधी त्यांचे हे म्हणणे येत नाही, हे त्यांचे मत नक्कीच विचार करण्यासारखे आहे.

आजचा अमेरिकन समाज वंशवादी आहे, म्हणून वंशवादाला प्रोत्साहन देणारे, वेगवेगळ्या वंशाच्या लोकांच्या बुद्ध्यंकाविषयी कोणतेही संशोधन केले जाऊ नये, असे चोम्स्की म्हणतात.

प्रामाणिकपणा, सत्यनिष्ठा, जबाबदारी व आस्था किंवा responsibity हे फार महत्त्वाचे मानवी गुण आहेत, असे त्यांचे मत आहे. पण या गुणांचा अंगीकार करणे फार कठीण आहे, असेही ते नोंदवतात.

*चोम्स्की रीडर* या पुस्तकात इतरही विषयांवर चोम्स्कींनी केलेले लिखाण समाविष्ट केलेले आहे. पण त्यातले बरेच लिखाण अमेरिकन प्रश्नांविषयी आहे. इथे फक्त ज्या लेखांना सार्वत्रिक महत्त्व आहे, त्यांचाच विचार केला आहे.

चोम्सकी हे मूलतः भाषाशास्त्रज्ञ आहेत. पण भाषाशास्त्रापुरते आपले मत व ज्ञान मर्यादित न ठेवता त्यांनी सर्व मानवजातीचा विचार सतत केला आहे. आपला विचार देशाच्या सीमा ओलांडून आंतरराष्ट्रीय स्तरावर त्यांनी नेला. त्यांच्या या कर्तृत्वामुळे ते अमेरिकेबाहेर जास्त लोकप्रिय असलेले विचारवंत आहेत. (अमेरिकेच्या धोरणावर टीका करणारे म्हणून अमेरिकेत त्यांचा उल्लेख बऱ्याचदा टाळण्यात येतो, असे वाटते.) आजचे सर्वांत मोठे विचारवंत म्हणून त्यांचे नाव सर्वत्र घेतले जाते.

टीपा -

१) *The Chomsky Reader* ed. James Peck (New York : Pantheon Books, 1987) हे पुस्तक समोर ठेवून हा लेख तयार केला आहे. या पुस्तकातील पहिली २०२ पाने आपल्या दृष्टीने महत्त्वाची

अनुक्रमणिका






आहेत. त्यांचाच उपयोग या लेखात केला आहे. नंतरच्या पानांत अमेरिका व जगातले इतर देश यांसंबंधीचे विषय हाताळलेले आहेत. उदाहरणार्थ, कोल्ड वॉर, अमेरिका व विएतनाम, मध्य अमेरिका, अफगाणिस्तान असे विषय त्या पानांत हाताळलेले आहेत.

२) या लेखात इतरही साधनांचा वापर केला आहे. इंटरनेटवरील काही साधनेही वापरली आहेत. चोम्स्की हे महत्त्वाचे जागतिक विचारवंत असल्याने त्यांच्यावर बरेच लिखाण झाले आहे.

३) किबुत्झ म्हणजे इझ्राएलमधली सामूहिक वसाहत. शेती हा तिथला मुख्य उद्योग असतो व ती ज्यूंची वसाहत समाजवाद व ज्यूवाद यांवर आधारलेली असते. १९०९ मध्ये जगातल्या ज्यूंनी पहिली किबुत्झ वसाहत उभारायला मदत केली. इझ्रायलमधले ४० टक्के शेतीउत्पादन तिथल्या अनेक किबुत्झमधल्या शेतीमधून होते.

# किरकोळ व्यापार क्षेत्रातील विदेशी थेट गुंतवणुकीचे राजगुह्य

शि. ना. माने

**गरज** :- बदलणाऱ्या समकालीन आंतरराष्ट्रीय वित्तव्यवस्था व व्यापार यांचे आलंकारिक भाषेत वर्णन करताना रॉबर्ट फ्रॉस्ट म्हणतात–

बिफोर आय बिल्ट अ वॉल
आय वुड आस्क टु नो
वॉट आय वॉज वॉलिंग इन
ऑर वॉलिंग आउट.......

त्याचे मराठी भाषांतर असे : "मी भिंतीचे बांधकाम करण्यापूर्वी मला ज्या प्रश्नाचे उत्तर जाणून घ्यावयाचे आहे, तो प्रश्न म्हणजे त्या भिंतीच्या आत काय असणार किंवा बाहेर काय असणार?" दुसऱ्या शब्दांत, बदललेले आंतरराष्ट्रीय वित्तव्यवस्थापन व व्यापारनियमन ध्यानात घेऊन एखाद्या देशाने कोणते धोरण अनुसरावे व कोणते धोरण टाळावे? विशेषत: जवळजवळ ५० वर्षांपूर्वी रॉबर्ट फ्रॉस्ट यांनी विचारलेला प्रश्न आज भारताच्या वित्तव्यवस्थापन व व्यापारनियमन यांच्याविषयीच्या धोरणाला तंतोतंतपणे लागू पडतो.

लोकसभेत २०१२-१३ चा अर्थसंकल्प मांडण्यापूर्वी भारताची राजकोषीय तूट ५.७ टक्के होती. २०१२-१३ च्या अखेरीस ती ५.१ टक्क्यांपर्यंत कमी करणे प्रस्तावित होते. आज त्या वर्षातील आठ महिने पूर्ण होऊनही ती तूट ६.१ टक्क्यांच्या पातळीवर गेली आहे. शिवाय, व्यापारतुटीने ४ टक्क्यांची पातळी गाठली आहे. म्हणजे आजमितीला देश वित्तीय परिभाषेत १०.१ टक्के ऋणको आहे. देशापुढील ही एक नाजूक व चिंतेची समस्या आहे. ती समस्या सोडविण्यासाठी देशापुढे पुढील काही पर्याय उपलब्ध आहेत–

(१) कर्मचाऱ्यांच्या तंत्रविद्याविषयक उत्पादकतेत वाढ करणे.

(२) उद्यमशीलतेत सुधारणा करण्यासाठी संशोधन व विकास गुंतवणुकीत स्थूल आंतर्देशीय उत्पादिताच्या (GDP) १.५ ते २ टक्क्यांच्या आजच्या प्रमाणात वाढ करणे.

(३) निर्यातक्षम बंदरांचे आधुनिकीकरण करणे.

(४) योग्य उत्तेजने व प्रोत्साहने देऊन उद्योग-व्यवसायाची विश्वासार्हता वाढविणे व ती दृढ करणे. परंतु त्या उत्तेजनांना प्रतिसाद न देणाऱ्या (Zombie) कंपन्यांचा विचार न करणे.

(५) अनावश्यक, योजनाबाह्य खर्चात यथाक्रम कपात करणे.

(६) वित्तीय तुटीतील चरित्रखलनायक म्हणजे इंधन, खते व अन्नअनुदाने. ती नगद रक्कमेच्या स्वरूपात थेट लाभार्थीच्या बँक खात्यात हस्तांतरित करणे. आज इंधन अनुदानांचे हस्तांतरण करण्याची प्रक्रिया सुरू आहे.

यांपैकी पहिले तीन पर्याय दीर्घकालीन असून आजच्या आपत्कालीन आर्थिक अस्थिरतेचे निवारण करण्यासाठी त्यांच्यावर विसंबणे परवडणारे नाही. चौथ्या पर्यायाच्या संबंधात चित्र फार आशावादी नाही. अगोदरच नियंत्रणाबाहेर गेलेल्या राजकोषीय व व्यापारत्रुटींमुळे सरकारची कोंडी झाली आहे. शिवाय, भारतीय रिझर्व्ह बँकेने काहीसे अपारंपरिक, व्यवहार्य व वाजवी धोरणाचे साधार समर्थन केले आहे. त्याचा येथे आवर्जून उल्लेख करणे जरुरीचे आहे.

जुलै २०१२ पासून बँकेने किंमतस्थैर्यापेक्षा वित्तीय स्थैर्याला जास्त महत्त्व देऊन त्यावर लक्ष केंद्रित केले आहे. पैसाविषयक धोरणासंबंधातील सुलभ/स्वस्त पैसा धोरण विरुद्ध अति व्याजी/महाग पैसा धोरण या संप्रदायांना अल्पविराम देऊन बँकेने 'महाताण कसोटी' (Macro-stress test) व व्याजदर कमी करण्याची पात्रता अट म्हणून 'सुरक्षा क्षेत्र' (Comfort zone) ही दोन नवोक्रमशील साधने (tools) विकसित करताना अलीकडील वित्तीय तूट नियंत्रणाबाहेर नेण्यास अप्रत्यक्षपणे हातभार लावणाऱ्या व 'महाआर्थिक धोक्यांच्या' (Macro-econmic shocks) भक्ष्यस्थानी पडलेल्या

अनुक्रमणिका

बँकव्यवसायाला अंशतः दिलासा देण्यासाठी केंद्राच्या 'टोकाच्या, फसव्या व प्रतिकूल' धोरणाचा परामर्श घेतला आहे, हे विशेष. आणि तो घेताना भारतीय अर्थव्यवस्थेत जोखीम व्यवस्थापनात उदय होणाऱ्या व्यवसायकर्त्यांच्या 'जोखमीकडे पाठ फिरविणाऱ्या' (Risk averse) वर्गाचा उल्लेख करण्यास बँक विसरली नाही. (पाहा- Financial Stability Report No.5, Supplement to RBI Bulletin, July 2012).

येथे बँकेच्या पुरवणीला पुरवणी क्र. २ जोडण्याची तीव्र इच्छा आहे. ती अप्रस्तुत ठरू नये. जोखमीकडे पाठ फिरविणाऱ्या उदयोन्मुख व्यवसायकर्त्या वर्गाचे अधिक स्पष्टीकरण करणे जरूर आहे. सर्वसाधारणपणे तो वर्ग सामाजिक हेतूविषयी बेपर्वा आहे. त्याच्याकडे व्यवसाय प्रशासनाची पदवी असलीच पाहिजे, असे बंधन नाही. तो स्वहितैक्यपरायणवादी (Egoist) आहे. प्रामुख्याने तो अधिकाधिक पैसा मिळविण्याच्या हेतूने (Mercenary motive) संमोहित आहे. त्यामुळे प्रसंगी जोखमीचा 'ध' चा 'मा' करण्यास तो मागेपुढे पाहत नाही. एका बँकेकडून सुलभ/नाममात्र तारणावर कर्ज घेणे, त्या गहाणपत्राचे शेअरमध्ये रूपांतर करणे, त्यावर दुसऱ्या बँकेकडून उचल घेणे, उद्या त्या उचलीचे थकित कर्जात रूपांतर होणे. शेवटी सरकार थकहमीस (जी क्वचितच वटते) तयार आहेच. तो जसा स्वघोषित व्यवसायकर्ता आहे, तसाच तो 'साक्षी' देखील आहे.

काही महिन्यांपूर्वी एका अभिजनाने रु.७.५ कोटी देऊन जमीन खरेदी केली. काही दिवसांपूर्वी ती रु. ५८ कोटीला विकली. हे अर्थशास्त्राच्या पुस्तकातील उदाहरण नव्हे. ते वास्तव आहे. आज अवतीभवती असे अनेक व्यवहार वेगाने घडतात. काही महिन्यांत रु.७.५ को. चा रु ५८ को. परतावा! या व्यवहाराला अतिवेगवान वित्तीय भांडवल गुणाकार (High-speed Financial Capital Multiplication) संबोधणे योग्य होईल. गुणाकार व निर्मिती (Creation) या स्वभावतः भिन्न संज्ञा आहेत.

आजच्या भरकटलेल्या (Turbulent) वित्तीय व्यवस्थेसाठी केंद्र जबाबदार आहे. व्याजदर कपात हा जरूर बँकेचा प्रांत आहे; परंतु व्याजदरात कपात करणे आजच्या भरकटलेल्या वित्तीय व्यवस्थेवर परिणामकारक उपाय होऊ शकत नाही. त्यासाठी गरज आहे केंद्राच्या राजकोषीय अनुशासनाची. बँकेच्या पुरवणी क्र. ५ मधील हा सूचित संदेश आहे.

आता राहिला पाचवा पर्याय. या संदर्भात वित्तमंत्र्यांनी निःसंदिग्ध शब्दांत संबंधित खातेप्रमुखांना सूचना दिल्या आहेत. परंतु जनादेशदत्त युतीतील मंत्रालयांकडून अपेक्षित प्रतिसाद मिळेलच, याची आज खात्री नाही.

अशा प्रकारे, चारी बाजूंकडून कोंडीत सापडलेल्या युती सरकारकडे एक आशेचा किरण म्हणून सहावा पर्याय शिल्लक राहतो. या पर्यायांतर्गत तीन प्रकारच्या अनुदानांपैकी सद्यःस्थितीतील फक्त इंधन अनुदानाची नगद रकमेत लाभार्थीच्या बँक खात्यात थेट हस्तांतरणाची प्रक्रिया प्रगतिपथावर आहे. ज्या प्रमाणात आधार क्रमांक व लाभार्थींना मोफत देण्यात यावयाचा मोबाईल सेट यांचा वापर वाढत जाईल, त्या प्रमाणत या सुधारणेच्या उपलब्धी सफल होतील. असो.

संकटात ज्या वेळी तुमच्यापुढील सर्व खुले पर्याय संपुष्टात येतात त्या वेळी नाइलाजास्तव संकटमोचन मार्गाचा वापर (Emergency exit by default) केला जातो. स्पष्ट शब्दांत सांगावयाचे, तर वित्तीय तुटीच्या खोल पाण्यात आपले डोके कसे बुडणार नाही, या भयाने आज किरकोळ व्यापार क्षेत्रात सरकारने ५१ टक्के विदेशी थेट गुंतवणुकीचा आसरा केला आहे. या गुंतवणुकीची गरज ही तिचे राजगुह्य (सरकारी परम गोपनीय) विशद करण्यास पुरेसे ठरावे.

**स्वरूप** - एक सुरुवात म्हणून भारतातील १० लक्ष लोकसंख्येपेक्षा जास्त लोकसंख्येच्या ५३ मोठ्या शहरांत किरकोळ व्यापार क्षेत्रात ही योजना सुरू होणार आहे. १४ सप्टेंबर २०१२ रोजी केंद्रीय मंत्रिमंडळाने तसा एकमताने निर्णय घेतला आणि २१ सप्टेंबर २०१२ रोजी त्यासंबंधात अध्यादेशही जारी करण्यात आला. आतापर्यंत या योजनेला संमिश्र प्रतिसाद मिळाला. सर्वसाधारणपणे या संमिश्र प्रतिसादाचे तीन प्रकार पडतात.

एक, अमेरिकेची वॉल-मार्ट, ब्रिटनची टेस्को किंवा फ्रान्सची कॅरेफोर या बहुराष्ट्रीय कंपन्या म्हणजे कोणी अक्राळविक्राळ राक्षस (Nightmare) आहे. तो

किरकोळ व्यापार क्षेत्रात उच्छाद मांडेल. एक दिवस किरकोळ व्यापार क्षेत्राला गिळून टाकेल.

दोन, याचे दुसरे टोक म्हणजे तथाकथित ५१ टक्के थेट गुंतवणूक म्हणजे एक जादूची कांडी आहे. फळे व भाजीपाला या शेतमालाची शेत ते शीतगृह सुगीपश्चात होणारी जवळजवळ सरासरी ३३ टक्के नासधूस टळेल. म्हणजे एरवी प्रतिवर्षी होणारा रु. ५०,००० ते रु. ५८,००० कोटींचा अपव्यय टळेल. तेवढी बचत होईल. ऑस्ट्रेलियात ती नासधूस १ टक्क्यापेक्षा कमी आहे. शेतकरी भारती वॉल-मार्टला ज्या वेळी थेट कोबी विकतो, त्या वेळी त्याच्या विक्रीत सरासरी २५ टक्के वाढ झाली आणि बटाट्याच्या उत्पन्नात ७ ते १० टक्के वाढ झाली. परंतु या तथाकथित अकल्पित लाभांची (Windfall gains) दुसरी बाजूही असू शकते. मध्यस्थ-दलालांच्या उच्चाटनामुळे शेतकऱ्यांचा जरूर फायदा होतो; परंतु त्यात अनुमापी अनुकूलतांचाही हिस्सा असू शकतो. तसेच हे सरासरी आकडे आहेत. ते आरोपित मूल्य (Imputed value) दर्शवितात. प्रतिवर्षी रु.५०,००० को. ते रु. ५८,००० को. अपव्यय टळला म्हणजे त्या वर्षी तेवढी बचत वाढली काय? कंत्राटी शेतीच्या संबंधात असममिती माहितीचे (आर्थिक व्यवहारात किंवा आदान-प्रदानात एक पक्ष दुसऱ्यापेक्षा जास्त जाणकार असण्याची स्थिती) अधिकतर लाभ कंपन्यांना मिळाले, असे काही अभ्यासांत सिद्ध झाले आहे.

किरकोळ व्यापार क्षेत्रातील ५१ टक्के थेट गुंतवणूक भयावह राक्षसही नाही किंवा जादूची कांडीही नाही. सत्य दोन टोकांच्या मध्ये दडले आहे. या मध्यममार्गी मतप्रणालीचे वैशिष्ट्य असे आहे, की एखाद्या क्षेत्राच्या अवकाळी यशाचा आटापिटा व्यर्थ होय. त्याच्या यशात अनेक प्रत्यक्ष-अप्रत्यक्ष घटकांचा सहभाग असतो. त्यांचा परस्परसांधा जुळविणे जास्त महत्त्वाचे असते. अनेकदा या ५१ टक्के थेट गुंतवणुकीच्या समर्थकांकडून सोयीस्कर आकडेवार माहिती पुरविली जाते. आपण तिचा मागे उल्लेखही केला. परंतु असाही अनुभव आहे. आकडे स्वतः लबाडी करत नाहीत. लबाड मात्र प्रसिद्धीच्या क्षेत्राच्या चमकत असतात (इट इज नॉट द फिगर्स दॅट लाय. बट इट इज द लायर्य, हु फिगर). अशा वेळी आपण कोणत्या मार्गाने जावयाचे? त्या लबाडीचा तपास करून तिचे निवारण करणारा विवेक व विज्ञानाचा प्रागतिक मार्ग. संगणितचलित समस्या अन्वेषण पद्धती (Algorithm) विकसित झाली आहे. योग्य आधार सामग्री (Data) व परिपूर्ण संकल्पन (Design) यांच्या आधाराने किरकोळ व्यापारातील ५१ टक्के गुंतवणुकीविषयी नोबेल विजेते (२००७) हर्विक्झप्रणीत 'प्रोत्साहनपर सुसंगती' संकल्पनेने (Incentive Compatibility) प्रत्येक आर्थिक विनिमयाचा परिव्यय किमान पातळीवर कसा ठेवायचा व त्या विनिमयात सहभागी एका अभिकर्त्याने (आपल्या उदाहरणातील शेतकरी व गुंतवणूक करणारी कंपनी) दुसऱ्या अभिकर्त्याच्या आर्थिक परिस्थितीत घट न करता आपल्या परिस्थितीत सुधारणा कशी करावयाची, ते शक्य झाले आहे.

या संदर्भात आणखी एका गोष्टीचा उल्लेख करणे जरूर आहे. ती गोष्ट म्हणजे केंद्रीय अन्नप्रक्रिया मंत्रालयाने तयार केलेला 'भविष्यवेध दस्तावेज' (Vision Document). २६ मार्च २०१० च्या टाइम्स ऑफ इंडियामध्ये तो प्रसिद्ध झाला आहे. त्याचे सार पुढे दिले आहे.-

अन्नप्रक्रिया मंत्रालयातील 'संशोधन व विकास' अंतर्गत योजनेचे प्रमुख उद्दिष्ट आहे शेतातील ताज्या उत्पादनाकडून प्रक्रियाकृत, आवेष्टित व वर्धित-मूल्य (Value-added) अशा अन्नाकडे संक्रमण करणे. या संक्रमणांतर्गत २०१५ पर्यंत प्रक्रियाकृत, आवेष्टित व वर्धितमूल्य अन्नातील टिकाऊ वस्तूंच्या पुरवठ्यात ६ टक्क्यांवरून १५ टक्क्यांपर्यंत, मूल्यवर्धनाच्या पातळीत २० टक्क्यांवरून ३५ टक्क्यांपर्यंत व त्यांच्या जागतिक व्यापाराच्या हिश्यात १.५ टक्क्यांवरून ३ टक्क्यांपर्यंत वाढ करणे. त्याचप्रमाणे मेगॅफूड पार्कसाठी रु. १५० को. ची तरतूद करणे. मध्यस्थांचे उच्चाटन करण्यासाठी अंतिम बजार (Terminal markets), मालाची परिरक्षा, शीत साखळ्या (Cold chains), पुरवठा/ रसद यंत्रणा (Logistics) इत्यादी आधारभूत संरचनांचा समावेश दस्ताऐवजात करण्यात आला आहे.

संकल्पन तयार करून त्याची मांडणी करण्यात

अन्नप्रक्रिया मंत्रालयाने तत्परता दाखविली. त्याबद्दल ते कौतुकास पात्र आहे. संकल्पने व प्रारूपे तयार करण्यात आम्ही कमी नाही; परंतु त्या संकल्पनांची/प्रारूपांची कार्यवाही करण्यात सरकार कमी पडले. या संदर्भात अलेक्झांडर पोप यांच्या पुढील बोचऱ्या विधानाची येथे आठवण होते : "निर्बुद्धांना सरकारच्या प्रकाराविषयी खुशाल (अधोरेखन माझे) वाद-प्रतिवाद करू द्यात. ज्याचे अत्युत्तम प्रशासन केले जाते, तेच अत्युत्तम असते." दुसऱ्या शब्दांत, चांगल्या सरकारची एकमात्र कसोटी असते उत्तम प्रशासन, त्याचा प्रकार (Form) नव्हे.

ही चर्चा पुढे नेण्यापूर्वी आणखी एक खुलासा. किरकोळ व्यापार क्षेत्रातील ५१ टक्के आर्थिक सुधारणेविषयीची अधिकतर चर्चा शेतकरी, शेतमाल, कृषि उत्पादन बाजार कायदे व मध्यस्थ-दलाल यांच्याभोवती फिरते. जणू काय या सुधारणेच्या परिघात तयार कपडे, गृहोपयोगी उपकरणे, अधिविपणि बाजार (super markets), वस्तू भांडारे, लघु बजार (mini markets) इत्यादींचा समावेश होतच नाही. श्रीलंका, मेक्सिको, ब्राझील, जपान, चीन, फिलिपिन्स इत्यादी देशांत विविध अटींच्या मर्यादेत किरकोळ व्यापार क्षेत्रात विदेशी थेट गुंतवणुकीचे प्रयोग सुरू आहेत. विदेशी गुंतवणूक करणाऱ्या कंपन्यांची स्पर्धात्मक सामर्थ्ये व त्यांचा भारतात विशिष्ट शहरांत अस्तित्वात असलेली वस्तु भांडारे, अधिविपणि व लघु बाजार यांच्यावरील आजच्या व संभवनीय परिणामांचा विचार करणे जरूर आहे.

**परिणाम/ प्रश्न :-**

(१) किरकोळ क्षेत्रात माल पुरविणाऱ्या वितरकांना सजग राहून सावध पावले टाकावी लागतील. कारण विदेशी थेट गुंतवणूक करणाऱ्या कंपन्या थेट उत्पादकांकडून माल खरेदी करणे पसंत करतात.

(२) वस्तू भांडारांच्या स्पर्धेत टिकून राहण्यासाठी देशातील मूळच्या वस्तू भांडारांना विदेशी कंपन्यांप्रमाणे घाऊक व्यापाऱ्यांऐवजी थेट उत्पादकांकडून वस्तू विकत घ्याव्या लागतील. विशेषतः जपानमध्ये वॉल-मार्टचे आगमन झाल्यानंतर जपानी किरकोळ व्यापाऱ्यांना वॉल-मार्टशी जुळवून घ्यावे लागले.

(३) कालबाह्य कामगार कायदे व विदेशी कंपन्यांची स्पर्धात्मक सामर्थ्ये यांच्यामध्ये स्वाभाविकपणेच संघर्ष असतो. कालबाह्य कामगार कायद्यात कालानुरूप बदल करण्याची गरज निर्माण होते. 'थेट गुंतवणूक आत व विशेषतः वेतनी, सोपीव कामे (Jobs) बाहेर', असा संघर्ष निर्माण होऊ शकतो. त्याचे संक्षेपात स्पष्टीकरण असे– विदेशी कंपन्यांच्या स्पर्धेत टिकण्यासाठी देशातील मूळच्या किरकोळ व्यापार आस्थापनांमुळे पुढील पर्याय खुले असतील. घाऊक व्यापाऱ्यांऐवजी थेट उत्पादकांकडून वस्तू खरेदी करणे. अनावश्यक व मनमानी वितरकांकडे पाठ फिरविणे. डबघाईला आलेली भांडारे बंद करणे. कामगारकपात करणे आणि अखेर नफा मिळविणे. यासाठी अधिविपणि व लघुविपणि यांची किती तयारी असेल?

दुसऱ्या शब्दांत, एका बाजूला रोजगार हमी किंवा ती शक्य नसेल तर बेकारभत्ता या धोरणाला कटिबद्ध वकामातुर सरकार आणि दुसऱ्या बाजूला ५३ मोठ्या शहरांतील तोट्यातील वस्तू भांडारातील तथाकथित कामविरहित अवस्था (Joblessness) या शृंगापत्तीला तोंड देण्याची जारी केलेल्या संबंधित अध्यादेशात कोणती खबरदारी घेण्यात आली आहे?

(४) अर्थात, वरील शृंगापत्ती निर्माण होण्यापूर्वी त्या समस्येवर एक उपाय संभवतो, तो पुढीलप्रमाणे आहे– आज दहा लक्षांपेक्षा जास्त लोकसंख्येच्या ५३ मोठ्या शहरांत सरासरी एक किलोमीटर परिघाच्या परिसरात डझनभर सुपर मार्केट व मिनी मार्केट यांची गर्दी आढळते. या शहरांत वॉल-मार्ट, कॅरेफोर व टेस्को यांच्या आगमनानंतर सुपर मार्केट व मिनी मार्केट यांना अनुमापी अनुकूलतांचा (Scale economies) आश्रय करण्याचा एक पर्याय उपलब्ध होऊ शकतो. मात्र त्या अनुषंगाने कोणी कोणात विलीन व्हावयाचे (Merger) हा 'मानापमान' प्रयोग अनिवार्य असेल. त्याविषयीचा शासनाचा गृहपाठ आज तयार हवा.

**समारोप :-**रॉबर्ट फ्रॉस्ट यांच्या काव्यपंक्तीतील भिंतीकडे पाठ फिरवून हे प्रश्न सुटणार नाहीत. ५१ टक्के गुंतवणुकीच्या वैधानिक तरतुदींना त्यांच्या कार्यदक्ष कार्यवाहीची जोड देणे जास्त महत्त्वाचे आहे.





अनुक्रमणिका

पुस्तक परीक्षण

# टिकाऊ अर्थकारण

बगाराम तुळपुळे

डॉ. जे. पी. कुमारप्पा हे महात्मा गांधींच्या हयातीतच त्यांच्या आर्थिक विचारांचे समर्थ भाष्यकार म्हणून मान्यता पावले होते. या विषयावर त्यांनी अनेक पुस्तके लिहिली आणि एकोणीसशे चाळीसच्या दशकात ती बरीच लोकप्रियही झाली. त्या वेळच्या कित्येक तरुण सार्वजनिक कार्यकर्त्यांचे प्रबोधन करण्याचे कार्य या पुस्तकांनी केले. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर गांधीजींचे विचार, विशेषतः त्या विचारांचे आर्थिक अंग हळूहळू मागे पडत गेले. स्वाभाविकपणे कुमारप्पांचे लेखनच काय, नावही विस्मृतीत बुडाल्याप्रमाणे झाले.

जून १९९१ नंतर ते आर्थिक धोरण आपल्या राज्यकर्त्यांनी स्वीकारले आहे, त्यात गांधीवादी आर्थिक विचारांना मुळीच थारा नाही. तसे पाहिले तर स्वातंत्र्य-प्राप्तीनंतर आर्थिक विकासाच्या नियोजित आकृतिबंधात गांधीवादी दृष्टिकोनाची हळूहळू पीछेहाट होत आली आहे. तरीही सत्ताधारी मंडळी उघडपणे त्या दृष्टिकोनाचा त्याग करीत नव्हती. जून १९९१ नंतर मात्र नव्या आर्थिक धोरणात गांधीवादी विचारसरणीला काही स्थान आहे, असा दावा आजचे शासनकर्ते करताना आढळत नाहीत. जागतिकीकरण (म्हणजे उद्योगप्रधान जगाशीच सांगड), अद्यायावत तंत्रशास्त्र आधुनिक उद्योग, विदेशी भांडवल, खुली आयात, भांडवलदारांना व उद्योगपतींना जास्तीत जास्त स्वातंत्र्य, खाजगीकरण इत्यादींवर नव्या आर्थिक धोरणाचा भर आहे. या धोरणाच्या पुरस्कर्त्यांना वाढती आर्थिक विषमता, परावलंबित्व, समाजातील एका छोट्या वर्गाचा वाढता उपभोगवाद किंवा चंगळवाद या समाजापुढील गंभीर समस्या आहेत, असे वाटत नाही.

याउलट, गांधीवादी आर्थिक विचार हा विकेंद्रीकरण, श्रमाची प्रतिष्ठा, स्वावलंबन, साधेपणा यांवर आधारलेला आहे. व्यक्तीने आपल्या गरजा फार वाढवू नयेत, त्या गरजा भागवण्यासाठी आवश्यक त्या वस्तू आपल्या सभोवतीच्या परिसरातच उपलब्ध होतील अशी उत्पादन-व्यवस्था असावी. त्या वस्तूंचे उत्पादन स्थानिक कारागीर स्वतःच आटोपशीर प्रमाणावर करू शकतील व त्यासाठी लागणारा कच्चा मालही जवळपासच उपलब्ध असेल असे उत्पादनांचे तंत्र असावे, त्यातून बेकार व्यक्तींना उत्पादक काम मिळावे, उत्पादनासाठी यंत्र वापरून मानवी काबाडकष्ट कमी करायला हरकत नाही, पण त्यामुळे कामगार यंत्राचा गुलाम बनू नये किंवा बेकार होऊ नये, अशा प्रकारची अर्थव्यवस्था गांधीजींना अभिप्रेत होती.

ज्या पद्धतीने आजच्या उद्योगप्रधान देशांचा विकास झाला व ज्या अर्थव्यवस्था तेथे प्रचलित आहेत, त्याच मार्गाने जाऊन आपल्या देशाचा विकास घडविण्याचे उद्दिष्ट नव्या आर्थिक धोरणाने स्वीकारले आहे. या पद्धतीनुसार लोकांचा जीवनस्तर उंचावणे म्हणजे त्यांना अधिकाधिक नित्य नव्या उपभोग्य वस्तू व सेवा उपलब्ध करून देणे, मग त्या खरोखर गरजेच्या असोत वा नसोत. अशा वस्तूंचे व सेवांचे उत्पादन जगात कोठे किफायत-शीरपणे करणे शक्य असेल तेथे करावे, त्यासाठी लागणारा कच्चा माल जगात जेथून मिळेल तेथून जमा करावा, त्यांची विक्री जगात जेथे ग्राहक सापडतील तेथे करावी, उत्पादनखर्च कमी करण्यासाठी अद्ययावत तंत्रे व ठोक उत्पादन पद्धती यांचा अवलंब करावा, अशा प्रकारे उत्पादन व विक्री करू शकतील, त्यासाठी आवश्यक ते भांडवल उभे करू शकतील अशा महाकाय औद्योगिक व व्यापारी संस्थांना जगभर व्यवहार करण्याचे स्वातंत्र्य असावे, या सगळ्या प्रक्रियांवर शासनाने नियोजन किंवा नियंत्रणे याद्वारे शक्यतो बंधने घालू नयेत. नव्या आर्थिक धोरणाचा आकृतिबंध असा आहे.

या दोन विचारसरणीमागील मूल्ये, गृहीतकृत्ये, उद्दिष्टे, कार्यपद्धती ही सारी मूलतः केवळ भिन्न नव्हेत, तर परस्पर विरोधी आहेत. हा विरोध नव्या आर्थिक धोरणाच्या रूपाने आज उघडपणे आपल्यापुढे उभा राहिला आहे. सारी प्रचारमाध्यमे यांपैकी एकाच विकल्पाचे अत्यंत







अनुक्रमणिका

मोहक चित्र आपल्यापुढे ठेवीत आहेत. समाजातील धनिक वर्ग व सुशिक्षित उच्च मध्यमवर्ग यांनी हेच चित्र आपला आदर्श म्हणून स्वीकारले आहे. शासनकर्ते त्याच दिशेने आपल्याला घेऊन जाण्याचा प्रयत्न करीत आहेत. याला पर्यायच नाही असाही अपसमज प्रस्तुत केला जात आहे. अशा वेळी या मार्गातील मूलभूत उणिवा वा धोके दाखवून देणे, त्याला पर्याय आहे हे ठासून सांगणे व त्या पर्यायाची रूपरेषा समर्थपणे मांडणे याची पुन्हा तीव्र निकड उत्पन्न झाली आहे. या कार्यात कुमारप्पांचे प्रस्तुत पुस्तक व अन्य लिखाण उपयुक्त ठरावे. मात्र या पुस्तकाचा आवाका केवळ एका विशिष्ट अर्थव्यवस्थेचे समर्थन करण्यापुरताच मर्यादित नाही. किंबहुना तो त्याचा सर्वांत महत्त्वाचा भागही म्हणता येणार नाही. वैयक्तिक जीवनमूल्ये व जीवनपद्धती, समाजव्यवस्था, व्यक्तित्वविकास, उत्पादन-पद्धती व तंत्र इत्यादी अनेक क्षेत्रांचे विवेचन या पुस्तकात आहे. त्यांचा अन्योन्य संबंध स्पष्टपणे दाखवण्याचा कुमारप्पांचा प्रयत्न आहे. त्याहूनही महत्त्वाचे म्हणजे विशिष्ट मूल्य व उत्पादनपद्धती यांचा समाजव्यवस्थेच्या आणि विकासप्रक्रियेच्या सातत्याशी, स्थायी तत्त्वाशी, सामाजिक न्यायाशी आणि शांततेशी कसा अतूट संबंध आहे, हे दर्शवणे हे या विवेचनाचे मूळ उद्दिष्ट आहे. स्वाभाविकपणेच, गांधीजींनी उपोद्घातात म्हटल्याप्रमाणे हे पुस्तक समजायला फार सोपे नाही. त्याचे नीटपणे आकलन होण्यासाठी 'ते दोनदा किंवा तीनदा काळजीपूर्वक वाचण्याची जरुरी आहे.' कुमारप्पांची विवेचनपद्धती अगदी साधीसरळ आहे. तिच्यात शब्दांचा फुलोरा किंवा विद्वत्तेचे प्रदर्शन नाही. पण हा साधेपणा फसवा आहे.

"स्थायी" शब्द या पुस्तकात जड गतिहीन अर्थाने वापरलेला नाही. नदीतील पाणी नित्य वाहत असले, तरी नदी आपण स्थायी मानतो. निसर्गात वनस्पति-सृष्टी व प्राणिसृष्टी यांत जन्ममृत्यूचे रहाटगाडगे सतत फिरत असते, याच गतिमान अर्थाने "स्थायी" हा शब्द येथे वापरला आहे.

व्यक्तीचे जीवनमूल्य स्वार्थ साधण्याचे नसावे; तर भोवतीच्या समाजाला साहाय्य करण्याचे, त्याची सेवा करण्याचे असावे. मनुष्याची जीवनपद्धती "स्थायी" म्हणजे कमीत कमी वस्तू व सेवा यांची गरज भासणारी असावी. अशा किमान गरजा सभोवतीच्या परिसरातच उपलब्ध असणाऱ्या साधनसामग्रीतूनच भागण्यासारख्या असाव्यात. उत्पादनपद्धती कारागिराच्या अंगभूत गुणांना व सर्जकतेला जास्तीत जास्त वाव देणारी असावी, कारण त्यामुळेच त्याचे व्यक्तित्व विकास पावेल व जीवन अर्थपूर्ण होईल अशी जीवनपद्धती स्वीकारणाऱ्या व्यक्तीला फार परावलंबी व्हावे लागणार नाही. तसेच त्याचीही अंगभूत वैशिष्ट्ये प्रकट होऊन त्याचाही व्यक्तिविकास साधेल. माणसांनी अशा प्रकारची जीवनमूल्ये स्वीकारली व समाजही अशा उत्पादनपद्धतीवर उभा राहिला म्हणजे अनायासेच माणसामाणसांतील हेवेदावे व स्पर्धा यांच्या जागी सहकार्य व सेवा यांना महत्त्व प्राप्त होईल आणि सहकार्य व सेवा यांवर आधारलेली समाजव्यवस्था व अर्थव्यवस्था स्वाभाविकपणेच चिरस्थायी होतील. तेथे हिंसेला – मग ती व्यक्तिव्यक्तींमधील असो, गटागटां-मधील असो वा राष्ट्राराष्ट्रांतील असो– वाव राहणार नाही. प्रस्तुत पुस्तकाचा सारांश वरीलप्रमाणे मांडता येईल.

कुमारप्पा असेही आग्रहाने सांगतात, की माणसांनी करायच्या उत्पादक चाकोरीबद्दल काबाडकष्टांबरोबरच कामगाराच्या अंगभूत गुणांच्या विकासाची संधी आणि काम करण्यापासून मानसिक समाधानही साधली पाहिजेत. कामगाराला केवळ एका छोट्या चाकोरीत तेच तेच काम सतत करावे लागेल आणि तो करतो ते काम व त्या कामातून निर्माण होणारी अंतिम वस्तू किंवा सेवा यांचा परस्परसंबंध त्याला जाणवणारच नाही इतक्या थरापर्यंत श्रमविभाजन जाऊ नये.

या विचाराचे मंडन करताना याच्या विरोधी विचाराचे खंडन करणेही क्रमप्राप्त आहे. हे खंडनमंडन करताना कुमारप्पांनी अनेक क्षेत्रांतील विविध उदाहरणे देऊन विवेचन मनोरंजक केले आहे व त्याबरोबरच व्यक्तींच्या व समाजाच्या व्यवहारातील वेगवेगळ्या प्रवृत्तींचे विश्लेषण, मूल्यांकन व त्यांचे परिणामही स्पष्ट केले आहेत. त्यांनी समाजव्यवस्था व व्यक्तींच्या प्रवृत्ती यांची गुणानुसार व व्यवहारानुसार पाच वर्गांत विभागणी केली आहे, परजीवी, लुटारू व्यवस्था या शोषण व अन्याय यांवर आधारलेल्या, स्वतः समाजासाठी काहीही न करणाऱ्या म्हणून सर्वथा

त्याज्य. सेवाभावी ही नि:स्वार्थ सेवेवर आधारलेली म्हणून सर्वश्रेष्ठ वृत्ति. साहसी वृत्ती स्वार्थासाठी का होईना जी धडपड करते तिच्यातून बऱ्याच प्रमाणात समाज हितही साधते म्हणून ती, त्याचप्रमाणे कळपवृत्ति अनुकरणाने का होईना, अनेकदा समाजहित साधते म्हणून ती, या दोन मध्यम दर्जाच्या मानल्या आहेत.

व्यक्तीच्या जीवनपद्धतीला सामान्यपणे लावली जाणारी "उच्च" व "हलकी" ही विशेषणे चुकीची व दिशाभूल करणारी आहेत, असे कुमारप्पांचे प्रतिपादन आहे. तथाकथित उच्च पद्धती ही वस्तुतः "गुंतागुंतीची" असते व त्यामुळे ती अनेक समस्या निर्माण करते, उलट हलकी म्हटली जाणारी जीवनपद्धती ही साधेपणाने जीवनाच्या खऱ्या गरजा पुरी करणारी असेल, तर ती व्यक्तीला व समाजाला उपकारक ठरेल. गुंतागुंतीच्या जीवन पद्धतीत मनुष्य आपल्या खऱ्याखुऱ्या गरजांव्यतिरिक्त अनावश्यक अशा वस्तू व सुविधा यांचा अधिकाधिक हव्यास धरतो, दुसऱ्यांचे अनुकरण करण्यात धन्यता मानतो व परिणामी कारखानदारांच्या जाहिरात-बाजीच्या लोंढ्यात वाहत जातो. उलट साध्या जीवनपद्धतीत गरजा मर्यादित ठेवल्यामुळे मनुष्य अधिक स्वावलंबी बनतो. उपभोगवादी जाहिरातबाजीच्या प्रभावापासून दूर राहिल्यामुळे त्याला स्वतःच्या आवडीनिवडीनुसार राहण्याला जास्त वाव मिळेल. म्हणून त्याच्या सर्जकतेला व कलागुणांनाही जास्त वाव मिळेल, असे कुमारप्पांचे प्रतिपादन आहे.

गुंतागुंतीच्या चंगळवादी जीवन पद्धती अंगिकारल्यामुळे परजीवी व लुटारू व्यवस्था कश्या पसरत व खोलवर रूजत जातात, त्यातून भ्रष्टाचार, गुन्हेगारी व हिंसा सर्वत्र, सर्व स्तरावर कशी थैमान घालू लागते, हे आपण आज आपल्या समाजात तसेच जगभर प्रत्यक्ष बघतोच आहोत. लूट आणि हिंसा यांवर आधारलेली अशी अर्थव्यवस्था व समाज व्यवस्था न्याय्य, टिकाऊ होऊ शकणार नाही हे उघड आहे. अण्वस्त्रांसह अनेक विनाशक शस्त्रास्त्रांचा जगभर प्रसार, साऱ्या जगाच्या अर्थव्यवस्थेवर कुरघोडी करून त्याची लूट करण्याची काही देशातील मूठभर औद्योगिक व व्यापारी संस्थांची धडपड, देशांतर्गत बहुसंख्य जनतेचे समाजातील छोट्याशा वर्गांकडून शोषण व दमन, पर्यावरणांचे प्रदूषण, मानवी अधिकारांची पायमल्ली आणि या सगळ्यांमुळे मनुष्याच्या स्वत्त्वाची, व्यक्तित्वाची घुसमट हे आजच्या युगाचे विदारक वास्तव्य आहे.

या वास्तवाच्या पार्श्वभूमीवर कुमारप्पांनी जवळजवळ अर्ध शतकापूर्वी मांडलेले काही विचार काहीसे भाबडे, अवास्तव, गोंधळलेले असे वाटतात. ज्यांना प्रस्तुत पुस्तकातील मध्यवर्ती प्रमेय मान्य आहे, अशाही अनेकांना त्यातील काही विचार किंवा युक्तिवाद पटणार नाहीत. उदाहरणार्थ, स्त्री-पुरुषांचे शरीरसंबंध फक्त प्रजोत्पादनाच्या उद्देशासाठीच व्हावेत. शारीरिक सुखासाठी नकोत, असा कुमारप्पांचा आग्रह आहे, म्हणूनच कुटुंब नियोजनासाठी गर्भ प्रतिबंधक साधनांचा वापर त्यांना अमान्य आहे. प्राचीन चातुर्वणव्यवस्थेविषयी ते म्हणतात, "जोपर्यंत त्यांच्या शारीरिक गरजा भागवण्यात येतात आणि जोपर्यंत जीवनाच्या संथ प्रवाहाची खात्री देण्यात येते तोपर्यंत आनंदाने सेवा करणारे शूद्र (पृ.२१.) – पण हे "आनंदाने" सेवा करीत असत – प्राचीन काळी सुद्धा – असे गृहीत धरूनहि त्यांना परजीवी किंवा लुटारू वर्गातच घातले आहे. या दोन वर्गांची गमके व उदाहरणे त्यांनी दिली आहेत. त्यांच्याशी हे पूर्णपणे विसंगत दिसते, शिवाय अशी सेवा करणाऱ्या शूद्रांना समाजात मान नाही हे कुमारप्पा समर्थनीय वाटते, का तर शूद्र हा आपल्या वैयक्तिक गरजा भागविण्यासाठीच काम करतो. वैश्य हा त्यांच्यामते शूद्रापेक्षा विशेष अधिक मानाचा अधिकारी नाही. तो अधिकार क्षत्रियांचा व त्याहून अधिक ब्राह्मणांचा. (पृ.३३) साधेपणाच्या जीवनपद्धतीचा पुरस्कार करताना इंग्रज माळी व भारतीय संस्थानांचा दिवाण यांच्या जीवनपद्धतीची त्यांनी केलेली तुलना उथळ वाटते (पृ.६९). पुढे कुमारप्पा स्वतःच नमूद करतात, की एका ठिकाणी गरजेची असलेली वस्तू दुसऱ्या ठिकाणी अनावश्यक असू शकेल. (पृ.७९) मग इंग्रज माळी घरात टेबलखुर्च्या ठेवतो व काटा-चमच्यांनी जेवतो म्हणूनच त्याची जीवनपद्धती केरळात घरात टेबलखुर्च्या न ठेवणाऱ्या व केळीच्या पानावर हाताने जेवणाऱ्या दिवाणापेक्षा हीन कशी म्हणायची? अर्थात केवळ आपले जीवनमान "उच्च" दिसावे म्हणून इंग्रज माळयाची जीवनपद्धती अंगिकारली

आज केवळ केरळीय दिवाणच नव्हे, तर साऱ्या उच्च व मध्यमवर्गीय भारतीयांनी तो ध्यास घेतलाच आहे- तर त्याचे समर्थन होऊ शकत नाही, हा कुमारप्पांचा मुद्दा महत्त्वाचा आहे.

"जर आपण जनतेची उत्पादनशक्ती वाढवली आणि तयार स्थानिक बाजारपेठ मिळेल अशा रीतीने मालाच्या विक्रीची योजना केली, तर लोकांची जीवनपद्धती आपोआपच वाढेल." (पृ.७९) हे विधान सोपे व सहज पटण्यासारखे वाटते; परंतु ते करायचे कसे हाच तर मुख्य प्रश्न आहे. उत्पादनशक्ती वाढवण्यासाठी भांडवल, अवजारे व इतर साधने, तंत्रे, ऊर्जा यांची गरज असते. ही सारी उपलब्ध करण्यासाठी आणखी भांडवल, साधने, यंत्रे यांची आवश्यकता असते. तसेच वाढलेल्या उत्पादन-शक्तीतून उत्पादित माल स्थानिक बाजारपेठेतच विकला जाईल की नाही, हे तो माल कोणत्या प्रकारचा आहे यावर अवलंबून असेल. जीवनाच्या प्राथमिक गरजा, म्हणजेच किमान आवश्यक अन्न, वस्त्र, निवारा यांच्या उत्पादनाच्या बाबतीत वरील विधानानुसार अर्थव्यवस्था राबवणे कदाचित शक्य होईल. आपल्या देशात असंख्य लोकांच्या या किमान आर्थिक गरजाही पुऱ्या होत नाहीत. त्या भागविण्यासाठी तसे करण्याला प्राधान्य असावे हेही बरोबर आहे. परंतु जीवनमान या किमान पातळीच्या थोडेही वर आणायचे असेल, तर त्यासाठी आवश्यक त्या साऱ्या वस्तू व सुविधा केवळ स्थानिक उत्पादन व विक्रीच्या अर्थव्यवस्थेतून उपलब्ध होणार नाहीत. त्या उपलब्ध करण्याच्या प्रयत्नात अर्थव्यवस्था गुंतागुंतीची होत जाणे अपरिहार्य आहे. नदीला बांध घालून साठवलेल्या पाण्यापासून वीजनिर्मिती करणे हे कुमारप्पांना मान्य आहे. (पृ.१५) तसेच शास्त्रज्ञांनी मानवजातीच्या कल्याणासाठी संशोधन करून नवेनवे शोध लावणे हेही त्यांना उपयुक्त वाटते. पण हे घडेल त्या प्रमाणात अर्थव्यवस्था स्थानिक उत्पादन व विक्री यांपासून दूर जाते हेही लक्षात घेतले पाहीजे.

कुमारप्पांनी पुरस्कारलेली सेवामूल्यावर आधारित अर्थ व समाजव्यवस्था ही काही व्यक्ती किंवा गट यांच्यापुरतीच नाही, तर साऱ्या समाजासाठी आहे, असे ते आवर्जून सांगतात. पण समाजातील सर्व लोक एकच मूल्यश्रेणी स्वीकारतील, असे होणार नाही, हेही त्यांना मान्य आहे. सर्वसामान्य अनुभवही हाच आहे, की समाजात खऱ्याखुऱ्या सेवावृत्तीचे लोक फारच थोडे असतात. फार मोठी बहुसंख्या कळप आणि उद्योगी (साहसी) वृत्तीची असते. केवळ परजीवी किंवा लुटारू वृत्तीचेही थोडेच असतात. कुमारप्पांनी म्हटल्याप्रमाणे एक व्यक्तीदेखील सर्ववेळी एकच वृत्ती प्रकट करीत नाही. या साऱ्या वृत्ती तिच्यात कमीअधिक प्रमाणात वास करीत असतात. वेगवेगळ्या प्रसंगी वेगवेगळ्या प्रवृत्ती त्यांच्या वर्तणुकीत निर्णायक ठरतात. म्हणून सारा समाज किंवा समाजाचा मोठा भाग सेवाव्यवस्थेचा नित्य अंगीकार करील, हा विचार भाबडेपणाचा वाटतो.

व्यक्तीच्या जीवनपद्धतीच्या बाबतीतही असाच पेच जाणवतो. कमीतकमी गरजांवर आधारित "साधी" राहणीच व्यक्तीला व समाजालाही श्रेयस्कर हे मान्य करूनही साधेपणाची रेषा कोणी व कुठे काढायची, हा प्रश्न शिल्लक राहतोच. निष्ठावंत गांधीवाद्यांच्या समूहातसुद्धा साधेपणात गांधीजींची बरोबरी करू शकतील, असे थोडेच होते. साधेपणा कोठे संपतो व उपभोगवाद वा चंगळवाद कोठे सुरू होतो, याचे उत्तर व्यक्ति विशिष्ट आणि परिस्थितिविशिष्ट असेल.

आणि तरीही सेवाभावी व लुटारू समाजव्यवस्था यातील व व्यक्तींची साधी किंवा चंगळवादी जीवनपद्धती यांतील फरक अर्थहीन, असे म्हणता येत नाही. स्वार्थीपणा व परजीवीपणापेक्षा निःस्वार्थीपणा समाजाच्या स्थायीपणाच्या संदर्भात निःसंशय श्रेष्ठ मूल्य आहे. तसेच जेथे समाजातील फार मोठ्या संख्येच्या प्राथमिक गरजाही पुऱ्या होत नाहीत, तेथे जीवनपद्धती म्हणून उपभोगवाद निःसंशय समाजविरोधी मानला पाहिजे. प्रश्न आहे, व्यवहारात हे आदर्श कसे साधायचे?

माझ्या मते या बाबतीत वैयक्तिक वर्तणुकीचा व सामाजिक मानकांचा विचार वेगवेगळा करावा लागेल. वैयक्तिक जीवनात साधेपणा व निःस्वार्थीपणा यांच्या सीमारेषा कोठे आखायच्या, हे प्रत्येक व्यक्तीला स्वतःच्या प्रकृतिधर्मानुसार ठरवावे लागेल. दुसऱ्या कोणी या रेषा आखून प्रत्येक व्यक्तीवर लादणे शक्य होणार नाही. ते इष्टही नाही. मात्र जे कोणी जीवनमूल्य म्हणून

निःस्वार्थीपणा व साधेपणा मान्य करतील, त्यांच्यावर या दोन्ही बाबतींत आजच्यापेक्षा उद्या जास्त पुढे पाऊल टाकण्याचा सतत प्रयत्न करण्याची जबाबदारी पडते.

संपूर्ण समाजाचा विचार करताना साधेपणाचा निकष समाजाच्या एकंदर आर्थिक परिस्थितीवर आधारला पाहिजे. जेवढ्या वस्तू व सेवांचा उपभोग घेणे सामान्य मनुष्याच्या आर्थिक आवाक्यात असेल त्याहून फार जास्त प्रमाणात त्यांच्या उपभोगाची हाव समाजात निर्माण होणे धोक्याचे आहे. शासन व समाजमानस घडवणारी इतर मंडळी यांनी या निकषानुसार समाजाचे प्रबोधन व नियमन केले पाहिजे. सामाजिक मूल्य म्हणून जीवन-मानाची, उपभोगाची काही मानके ठरवली पाहिजेत.

व्यक्तिगत जीवन व समाजव्यवस्था यात साधेपणा व निःस्वार्थीपणा ही मूल्ये प्रसृत करण्यात समाज-धुरिणांवर फार मोठी जबाबदारी येते. त्यातही केवळ शाब्दिक प्रबोधनापेक्षा त्यांच्या स्वतःच्या वर्तणुकीतून कोणती मूल्ये प्रतिबिंबित होतात, याला महत्त्व आहे. 'यद्यदाचरति श्रेष्ठस्तत्तदेवेतरोजनाः' किंवा 'ममवर्त्मानुवर्तन्ते मनुष्याः पार्थ सर्वशः' ही वचने एक व्यावहारिक सत्य मांडतात. शासनाबरोबरच साहित्य, कला, उद्योग-व्यापार, क्रीडा, व्यवसाय, स्वयंसेवी संघटना इत्यादी विविध क्षेत्रांतील नेत्यांनी स्वतःच्या वर्तणुकीने साध्या जीवनपद्धतीचे व निःस्वार्थी जीवनमूल्यांचे आदर्श समाजापुढे ठेवले तरच समाजातून परजीवी व लुटारू प्रवृत्तींचा प्रभाव कमी होऊ शकेल तसेच बहुसंख्य जनतेच्या उद्योगी व कळप्रवृत्तीतून स्वार्थाचा अंश मर्यादित ठेवता येईल.

---

**संपादकीय टीप :** कॉ. बगाराम तुळपुळे हे कामगार चळवळीतील नामवंत कार्यकर्ते होते. त्यांनी "Economy of Permanance" या जे. सी. कुमारप्पा यांच्या पुस्तकाचे १९९२ साली केलेले परीक्षण येथे छापत आहोत.

## लेखकांचा परिचय

### ⌘ डॉ. द. भि. कुलकर्णी

पुणे येथे भरलेल्या साहित्य संमेलनाचे अध्यक्ष. नागपूर विद्यापीठात मराठीचे प्राध्यापक व विभाग प्रमुख. मराठी साहित्याचे नामवंत समीक्षक.

***पत्ता :–*** वसुधा ई-००४, डीएसके विश्व ऑफ सिंहगड रोड, धायरी, पुणे–४११०४१.
दूरध्वनी :(०२०)२४३८०८९४.

### ⌘ प्रा. डॉ. सु. रा. चुनेकर

पुणे विद्यापीठातील मराठी विभागप्रमुख म्हणून निवृत्त. अनेक पुस्तके व समीक्षात्मक लेखांचे लेखन. माधवराव पटवर्धन ऊर्फ माधव ज्युलियन यांच्या वाङ्मयाचा अभ्यास.

***पत्ता :–*** प्रा. डॉ. सु. रा. चेनकर, शतदिप एस-४ ३५९ ब-२, मॉडेल कॉलनी, पुणे-४११०१६. दूरध्वनी :(०२०)२५६५१३५७.

### ⌘ प्रा. डॉ. गोमटेश्वर पाटील

'विसाव्या शतकातील कादंबरीची समीक्षा' या विषयावर पी.एच.डी., विलास सारंग यांच्या कथांचा अभ्यास. अर्वाचीन मराठी जैन साहित्य (१८५०-२०००) या मेजर प्रोजेक्टवर अभ्यास सुरू.

***पत्ता :–*** सहायक प्राध्यापक, महावीर महाविद्यालय, कोल्हापूर –४१६१०१.
भ्रमणध्वनी : ९८५०७५८२०७

### ⌘ प्रा. डॉ. अशोक कृष्णाजी जोशी

इंग्रजी या विषयाचे प्राध्यापक (निवृत्त.) गोवा विद्यापीठ; सौंदर्यशास्त्र, समीक्षा, तत्त्वज्ञान या विषयांचे अभ्यासक.

***पत्ता :–*** १२ सिंगबाल बिल्डिंग, टोक, करंझोले, गोवा ४०३००२.
दूरध्वनी : ०८३२–२४६२९८१.

### ⌘ श्री. शि. ना. माने

अर्थशास्त्राचे निवृत्त शिक्षक, माजी अध्यक्ष, मराठी अर्थशास्त्र परिषद (पुणे-१९९५) आर्थिक विषयांवर वाचन-स्वाध्ययन-लेखन.

***पत्ता :–*** १२ 'दर्शन', सहयोग गृहनिर्माण संस्था, गोरखपूर, सातारा–४१५००३.

### ⌘ श्री. बगाराम तुळपुळे

इंजिनियर होते. कामगार चळवळीतील नामवंत कार्यकर्ते होते. राऊरकेला पोलाद कारखान्यामध्ये मुख्य संचालक.

***पत्ता :–*** ४६/बी ३, बचानी नगर, मालाड पूर्व, मुंबई–९७.

हे मासिक घ. वा. जोशी यांनी के'सागर ग्राफिक्स ॲण्ड प्रिंटर्स, गणपती आळी, वाई, पिन : ४१२८०३ येथे छापून सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

अनुक्रमणिका

# नवभारतास

# हार्दिक

# शुभेच्छा !

**– पु.ना. गाडगीळ आणि कंपनी यांच्याकडून**

हे मासिक घ. वा. जोशी यांनी सन प्रिंटर्स, गणपती आळी, वाई, पिन : ४१२८०३ येथे छापून सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

अनुक्रमणिका